# सोन्याची माती

( एक स्वतंत्र सामाजिक नाटक )



लेखक :—

स० हृदय, बी. ए.

महाड



प्रथमावृत्ति मे १९४३

---

: : महाराष्ट्र ग्रन्थ-भांडार मुंबई नं. ४ : :

# महाराष्ट्र रंगभूमीला
# पहिलें वंदन....



लघुकथा लेखक व कादंबरीकार म्हणून मी महाराष्ट्रीय रसिकांना परिचित आहे, तरी नाटककार म्हणून मी आज प्रथमच त्यांच्यापुढें येत आहे. नाट्यकलेच्या क्षेत्रांत पहिलें पाऊल टाकतांना माझें मन साशंक होत आहे. तरीपण पहिल्या भेटींतच नाट्यप्रेमी रसिकांशीं मला मोकळेपणानें पुष्कळ-पुष्कळ बोलावेंसें वाटत आहे. पण त्यांनीं मला आपल्या विश्वासांत घेण्याइतका आमचा परिचय नाहीं ही गोष्ट तितकीच खरी आहे. त्यामुळें अगदीं ओंठावर आलेले शब्द मागें लोटावे लागत आहेत.

महाराष्ट्रांतील कसलेले ज्ञानी टीकाकार माझ्या या सोन्याच्या मातीला, पाश्चात्य नाटककारांच्या कलाकृतींच्या कसोटीवर घासघासून, तिचें मोल ठरवितील यांत मला बिलकूल संदेह वाटत नाहीं. तरीपण बहुसंख्य महाराष्ट्र-नाट्यकला-प्रेमी प्रेक्षक या ज्ञानी दृष्टीची चाळशी वापरीत नसल्यामुळें, ते माझ्या या पहिल्या स्वतंत्र नाट्यकृतीची योग्य ती बूज राखतील अशी खात्री बाळगतो.

हें नाटक लिहिण्याची कल्पना बरींच वर्षें माझ्या मनांत घोळत होती. पण गेल्या नोव्हेंबरमध्यें तें लिहून पुरें करण्याचा योग अनपेक्षितपणें लाभला. ज्या एका सामाजिक प्रश्नावर या नाटकाची उभारणी केली आहे तो जितका घरगुती आहे तितकाच तो नाजुकही आहे; हें लक्षांत ठेऊन, विषयाच्या आविष्काराच्या दृष्टीनें हें नाटक लिहित असतांना जरूर त्या संयमाच्या मर्यादा पाळण्याचा प्रयत्न केला आहे. तरीपण मला अपेक्षित असा परिणाम वाचकांच्या मनावर होतो कीं काय हें समजाऊन घेण्याचा प्रयत्न करावासा वाटला. लोकमान्य दैनिकाच्या सहसंपादकांनीं हा सुयोग अनायासानें जुळवून आणला; आणि गेल्या डिसेंबरमध्यें माझे मित्र श्री. शंकरराव सालपे यांच्या घरीं श्री. वा म. घाटे, वि. द. चिंदरकर, दिनकर साक्रीकर या नव-विचारी साहित्यिकांसमोर प्रथमच मी माझें हें नाटक वाचून दाखविलें. सौ. सालपे यांनीं आम्हां सर्वांना खाऊं घातलेल्या चविष्ट पदार्थांप्रमाणेंच या मित्रांना माझें हें नाटक आवडलें. त्यानंतर निरनिराळ्या वेळीं

नटवर्य केशवराव दाते, करमणूकचे संपादक श्री. देसाई, नट रामभाऊ वर्दे, गव्हाणकर, तसेंच श्री. प्रभाकर केशव गुप्ते, आंधळयाच्या शाळेचे लेखक श्री. वर्तक वगैरेंपुढें हें वाचून दाखविण्याची संधि लाभली. ह्या आणि अशा अनेक मित्रांच्या प्रोत्साहनानें व मदतीनें मी माझें हें नाटक प्रसिद्ध करीत आहे. अर्थात् तें मुंबईतील नाट्यप्रेमी प्रेक्षकांपुढें लौकरच येईल असें मी आश्वासन देतो.

हें नाटक मी कांहींशा घाईनें प्रकाशित करीत आहे. त्यामुळें नाटकांत कांहीं मुद्रणचुका तशाच राहून जाण्याचा संभव आहे. म्हणून अगोदरच मी माझ्या प्रिय वाचकांची क्षमा मागतो.

**सोन्याची माती** शक्य तितक्या लौकर प्रकाशित करण्यासाठीं घेतलेल्या श्रमाबद्दल व दाखविलेल्या जिव्हाळयाबद्दल महाराष्ट्र प्रकाशन संस्थेचे चालक श्री. शंकरराव कुलकर्णी यांचे मी हार्दिक आभार मानतो.

मुंबई
२०।५।१९४३.

सर्वांचा कृपाभिलाषी,
**स० हृदय**

—*—

# सोन्याची माती

## अंक १ ते ३

### पात्रें

| | |
|---|---|
| मोतीराम कोंदणे . . . . | . धनाढ्य कंत्राटदार |
| जवाहर . . . . . . | . त्याचा पुत्र |
| नीला . . . . . . | . मोतीरामची कन्या |
| रूपा . . . . . . | . जवाहरची पत्नी |
| ओपल . . . . . . | . किरिस्तांव—मोतीराम कोंदणे कंपनीचा भागीदार |
| पाचू . . . . . . | . नीलाची मैत्रीण |
| माणिक . . . . . | . मोतीरामच्या घरचा आश्रित विद्यार्थी |
| मंगल . . . . . | . नीलाचा एकेकाळचा प्रियकर |
| रत्ना . . . . . . | . घरांतील नोकर |
| पोखराज शेठ . . . . | . पोखराज आणि कंपनी या कंत्राटदार कंपनीचे मालक |
| रेडियो . . . . . | . |

---

स्थळ—ठाणें.

नाटकाचा काल—लागोपाठ तीन दिवसांचे सायंकाळ.

देखावा—तीनही अंकात एकच . . . मोती महालांतील आंतील दिवाणखाना.

*महाराष्ट्र रंगभूमीचे निस्सीम अभिमानी,*

*नाशिकचे प्रसिद्ध साहित्यिक आणि नट,*

**श्री. वामन श्रीधर पुरोहित** बी. ए.

यांना,

*माझ्यावरील त्यांच्या अकृत्रिम मित्रप्रेमाबद्दल*

**सप्रेम अर्पण.**

# सोन्याची माती

## अंक १ ला.

### [ स्थळ:— ठाणें. ]

( सायंकाळची पांच वाजण्याची वेळ. )

[ मोती महालांतील एक दिवाणखाना " मरावें परी कीर्तिरूपें उरावें, " " शिंपील त्याचा मळा—गाईल त्याचा गळा " वगैरेसारख्या सद्वचनांच्या पाट्या वरच्या बाजूला भिंतीवर चिकटविलेल्या आहेत. समोरच्या दोन्ही कोपऱ्यांत नग्न पुतळे ठेवलेले आहेत. मध्यभागीं एक उंची तिजोरी आहे. तिजोरीवर भिंतीला एक दत्ताचा फोटो लटकावलेला असून त्याच्या डाव्या बाजूला मोतीराम शेठचा व उजव्या बाजूला त्यांच्या मृत पत्नीचा असे एन्‌लार्जड् फोटो असून त्या तिहींवर फुलांच्या सुकलेल्या माळा लटकत आहेत. तिजोरीच्या डावीकडे एक ऑफिस-टेबल असून, उजवीकडे रेडियोस्टँडवर एक रेडियो आहे. स्टेजच्या उजवीकडे आंत येण्यास दरवाजा असून डावीकडे स्त्रियांसाठीं आंत जाण्याचा व पुरुषा-साठीं आंत जाण्याचा असे दोन दरवाजे आहेत. समोरच्या बाजूला उंची फर्निचर असून मध्यें एक टीपॉयसारखे टेबल आहे......नीला ऑफिस टेबलाजवळ पाठमोरी उभी असून कांहीतरी शोधीत आहे. रत्ना डोकावून जातो. नीलाच्या हातून टेबलावरची दौत सांडते. नीला डाग पडलेले पातळ झटकीत प्रेक्षकांसमोर येते. ]

**नीला:**—शाई सांडली वाटतं दादाची! दुसरीकडे ठेवायला त्याला जागा नव्हती जणूं! ( टेबलाजवळ जाऊन—वरची शाई ब्लॉटिंगनें पुसते—

खण उघडून पहाते, तों तिला एक अंक सांपडतो. कातरदृष्टीनें आजूबाजूला बघून ती तो अंक चाळूं लागते. )

**जवाहर:**—( रूपासह बाहेरून प्रवेश करीत ) काय करतेस निली तेथें ? ( नीला चमकते ) काय वाचतेस तें ? (अंक पाहून) समाजस्वास्थ्य ! ( हिसकावून घेतो. ) कुठें मिळालें हें तुला ?

**नीला:**—( टेबलाकडे बघत ) या इथं !

**जवाहर:**—पण तें उचलून घेतलेंसच कां तूं ? तुला मी बजावलें होतें असल्या पुस्तकांना तूं हात लावीत जाऊं नकोस म्हणून–

**रूपा:**—( जवाहरला ) पण आणावीं कां अशी मासिकें घरांत कुणी ? नि आणलीच तर तीं अशीं उघडयावर कां ठेवावींत ?

**जवाहर:**— मघां बाहेर जातांना कोटाच्या खिशांत हाताला लागलें, तें दिलें येथें ठेऊन नि गेलों बाहेर ! ( नीलाकडे ) पण वाटेल तिथली वस्तु उचलून हज्जार भानगडी करायची संवयच आहे नाहीं तरी हिला.

**रूपा:**—पण आपली चूक आपण सुधारायला हवी अगोदर माणसानें.

**जवाहर:**—( नीलाकडे) नि ही शाई केव्हां सांडून घेतलीस अंगावर ? ( रूपाला ) हीसुद्धां माझीच चूक वाटतं ? ( नीलाला ) कशी सांडलीस शाई या तुझ्या पातळावर ?

**नीला:**—कांही चांगलं गाणं असलं तर ऐकावं म्हणून आलें होतें. रेडियो लावावा म्हणून लिसनर शोधीत होतें. मला काय ठाऊक शाईच्या त्या बाटलीचें बूच ढिलें होतें तें ? लागला धक्का त्याला मी काय करूं ?

**जवाहर:**—( उसळून ) म्हणे मी काय करूं ? जन्माची धसमुसळी तूं ! शाई सांडून सवरून म्हणे मी काय करूं ?

**नीला:**—पण ठेवावी कां कुणी टेबलावर ?

**जवाहर:**—( चिडून ) काय म्हणालीस ?

**नीला:**—नीटपणें बूच लावलें असतंस तर ?

**जवाहर:**—पण तुला काय करायचं होतं तिथं जाऊन ?

**रूपा**:— असं काय करायचं तें ? तुम्हीच ना सकाळीं पेन भरून घेऊन तशीच दौत सारून ठेवलीत तिथं ?

**जवाहर**:—पण हिनें जावेंच कां टेबलापाशीं ?

**नीला**:—मला वाटलें—मी गेलें सहज.

**जवाहर**:—( वेडावीत पातळाकडे बघत ) नि ही शाई सहजच सांडून घेतलीस वाटतं ?

**नीला**:—( चिडून ) सांडली तर सांडली दुसरी आण नि पुन्हां अशी येथें ठेवीत जाऊं नकोस म्हणजे कोणी सांडणार नाहीं.

**जवाहर**:— मला शिकवतेस या गोष्टी नीले ? बाबांनीं तुला फारच चढवून ठेवलीय नाहींतरी !

**रूपा**:—पण मी म्हणते काय गैर सांगितलं वन्संनीं ?

**जवाहर**:— म्हणे काय गैर सांगितलें ? तूं गप्प बैस. माझं मी पाहीन.

**नीला**:—माझंही मी पाहिन. समजलास ?

**जवाहर**:—कुणाला उलट उत्तर करतेस तूं ? दोन दिल्या नाहींत तोंवर—

**नीला**:—( जवळ जाऊन ) आखाड्यांत तालीम करून करून तुला मस्ती आलीय्. मार-मारीन मारीन म्हणून नेहमी फुशारकी कशाला मार- तोस ? घे एकदां मारून !

**जवाहर**:—( रागानें पुढें सरकून ) फुशारकी काय ? ( तिच्या पाठींत गुद्दा मारतो. ) फुशारकी मारीत असतों काय मी ?

**नीला**:—अयाई ऽ ऽ......

**रूपा**:—( त्याला आडवित ) काय हें ? बहिणीवर हात चालवितां ? कांहीं वाटतं का ? शोभतं कां तुम्हाला हें ? ( त्याला लोटते. ) चला आंत... आंत चला पाहूं.

**नीला**:—बाबांना येऊं देत्.

**जवाहर**:—बाबांना येऊं देत् नाहींतर त्यांच्या बापाला येऊं देत-

**रूपा**:—कांहींच्या बाहींच काय बोलतां तें ?

**नीला:**—त्यांच्यासमोर चोरासारखा बसून राहतो...नि...

**जवाहर:**—गप्प बसतें कीं नाहीं? ( रूपाला वळसा घालीत ) आणखी तुझी कणीक तिंबवल्याशिवाय...

**रूपा:** –( झटकन् त्याला गांठून आडवते ) हां...हां...चला आंत ऐकतां कीं नाहीं माझं? ( ओरडून ) चला म्हणतेंना मी. मित्राकडे ब्रिज खेळतांना मघांशीं रबर खाल्लात त्याचा राग गरिब बिचाऱ्या बहिणीवर काढतां? चला.... ( त्याला लोटीत आंत नेताना ) (नीलाकडे) मी आलें हं अशी परत. ( दोघेजण जातात. )

**नीला:** – ( आईच्या फोटोकडे बघत ) आईगऽऽऽ... ( हुंदका देते. ...आपलें तोंड हातांनीं झांकून ती एका खुर्चीवर बसते. ) काय करूं मी? कोणाला सांगू मी माझ्या यातना. ( दत्ताच्या तसबिरीकडे बघते. ) देवा.. ( नमस्कार करते. ) जावं नाहींतर. पुन्हां पडायची गांठ दादाशीं–निघते–तोंच फोनची घंटा वाजते. ) कोण? साहेबकाका...बाबांची तार आलीय्...? साडेपांचला येणार आहेत? बरं. तुम्ही जाणार ना त्यांना स्टेशनवर आणायला .. बरं.. बरं. छे छे... पडसं आलंय् जरासें... हो हो... घेणार आहे काढा आज.. किती चांगले आहां काका तुम्ही..! ( रिसिव्हर ठेवते. ) काय करूं?. ( टेबलापाशीं जाते ) दुष्ट आहे नुसता माणिक.. सांगून तरी जायचं? ( विचार करून आंतील कॉलबेल वाजविते. )

**रत्ना:**—( प्रवेशून ) जी.. ( खाली बघत उभा राहतो. )

**नीला:**—( त्याच्याकडे न बघतांच ) बाबा आत्तां येतील इथं.. महाराजाला सांग–म्हणावें त्यांच्या चहाची तयारी करून ठेव चटकन्.

**रत्ना:**—बरें ( जाऊं लागतो )

**नीला:**—( टेबलावरच्या आरशांत रत्नाचे प्रतिबिंब दिसतांच ती बाजूला होते. ) माणिक केव्हांपासून नाहींत घरीं?

**रत्ना:**—आज सकाळपासून नाहींत.

**नीला:**—( नुसतीच वरच्या घड्याळाकडे पहाते. )

**रत्ना:**—( थांबून हलकेंच निघून जातो. )

**नीला:**— ( पुन्हां त्या टेबलाचा खण उघडते- शोधते. ) बाबा येताहेत नि नेमका त्याचवेळीं माणिक घरांतून निघून गेलाय. ( थांबून ) आतां कसं करूं मी ? ( उमासा सोडून कोचावर बसते. ) निरोप-निदान पत्र तरी देऊन जायचें—( फोनची घंटा वाजते ) कोण . . पाचू ? नाहीं. . नाहीं . . सकाळपासून गेलाय तो त्याचा पत्ता नाहीं . . पत्रबित्र पण नाहीं गेला ठेऊन माझ्यासाठीं. शोधले—त्याची खोली शोधली–सर्व ठिकाणीं शोधलें. नि आतां पण शोधतेंच आहे. मी तरी काय सांगूं कां गेला तो तें . . हो–ये–येना–( रिसिव्हर ठेवते. )

**रूपा:** — ( प्रवेशून ) वन्स ? अशा उभ्या कां तेथें ? पातळ नाहीं का बदलायचं ?

**नीला:**— निघालेंच मी ! पण तूं कुठें निघालीस आलीस नाहीं तोंच ?

**जवाहर:**—(येतां येतां) या चांभार चौकशा तुला काय करायच्यात्?

**नीला:**—( रूपाला ) बाबा इतक्यांत इथं येतील. त्यांनीं विचारलं तर काय सांगूं ?

**जवाहर:**—बाबा येताहेत ? कुणी सांगितलें ?

**नीला:**—साहेबकाकांचा फोन आला होता आतांच. ( जड पावलांनीं जाते. )

**जवाहर:**—त्या म्हातारड्याला उद्योग नाहीं दुसरा.

**रूपा:**— कोणत्या ? ( हसते. )

**जवाहर:**—रूपा ! मी बाबांना उद्देशून नाहीं बोललों हें.

**रूपा:**—( जवळ येत ) नाहीं म्हटलं बोलतांना लक्ष असतं कीं नाहीं एका माणसाचं तें बघावें. ( त्याच्या खिशांतील रुमाल नीट करून ठेवते. )

**जवाहर:**—येऊं देत बाबा आज आले तरी. आपल्याला मुंबईस गेलेंच पाहिजे.

**रूपा:**—मामंजी येताहेत घरीं आज दीड महिन्यानंतर. राहूं द्या आज. उद्यां जाऊंया का ? ( त्याच्या टायची गांठ नीट करते–कोट झटकते)

**जवाहर:**—पण आजची शेवटची मुदत आहे वर्षा अखेर नांवें नोंदायची. . . सभासदांची तिकिटें संपली म्हणजे . . .

**रूपा:**—चला गेली संपली तर. . . नाहीं पोहलं त्या तलावांत तर काय होणार आहे मोठंसं? समुद्र तर आहेना हवा तेवढा!

**जवाहर:**—अग पण... असं काय करतेस तूं! शेंकडो पॉलिशूड लोकांच्या ओळखी होतात.

**रूपा:**—मला नाहीं ओळखीची जरुरी वाटत एव्हढी (जवाहर नाराज होतो.) फोन करून बघांना वाटल्यास नांव नोंदतां आली तर . . . पहाना . . .

**जवाहर:**—(त्रासून) तुझ्या मनांत नसले तर तूं ऐकायची नाहींस रूपा— म्हण मामंजी येताहेत. नेहमीच येनात ते असे... कधीं नाहीं तो आजच बरा आलाय तुला बाबांविषयीं पुळका!

**रूपा:**— समजतं कां तुम्ही कुणाला काय बोलतां तें? (विनवणीनें) असं काय करायचं गडे?...वन्संना रडविलें. कोण हंसतमुखानें उभें राहील त्यांच्यापुढं? हे घर आहे. त्यांत त्यांची सून आहे -- मुलगी आहे— असं निदान दिसायला तरी नको का?

**जवाहर:**—नि माझ्या पुढंपुढं करायला तुला लाज वाटते मात्र... ठीक आहे.

**रूपा:**—असं काय तें? (त्याच्या कोटाचें बटन लावीत) दिवसभर इकडच्या भंवती भवती नाचते म्हणून बराय्.

**जवाहर:**--(त्याच स्वरांत वेडावीत) बराय् (फोन करतो) हॅलो... प्राणजीवन मफतलाल स्वीमिंग पूल–यस् यस् सभासदांची तिकिटें संपलीं का? दोन रिझर्व्ह करा माझ्यासाटीं. नावें—आमची नांवें मिस्टर आणि मिसेस जवाहर कोंदणे कॉन्ट्रॅक्टर्स...हो हो... ठाणा. ऑल राईट...थँक् यू!

**रूपा:**—(लटकेंच हसत) झालं ना समाधान एका माणसाचं? गेला ना राग? चला...उतरा हा जामानिमा आंत जाऊन.

**जवाहर:**—काय त्रास आहे हिचा...मुंबईला फिरून आलों असतों

एकदां . . .निदान एकादें झकूसें पिक्चर पाहिलें असतें . . .पण तुला कुठाय हौस ?

**रूपा:**—भाग्य आहे गडे माझं, मला इकडच्यासारखा हौशी सौंगडी मिळाला तें ( हसते. ) चला . . .( दोघेहि आंत जातात. )

( रत्ना प्रवेश करतो. )

**रत्ना:**—सगळं झकूपक् दिसायला हवं साहेबांना ! ( मोतीरामच्या फोटोकडे ) वारे धनी . . .( फर्निचर पुसूं लागतो )

**नीला:** – ( घाईनें प्रवेशून ) सायकलीवरून बाजारांत जा नि फुलांचे हार घेऊन ये तीन . . .( वर बघून ) हे सुकून गेलेत अगदीं.

**रत्ना:**—( न बोलतांच निघून जातो. )

**नीला:** —( पुढें होऊन बाहेरचा दरवाजा उघडते. . .पाचू येते. ) पाहिली तुला मी खिडकींतून . . .कांपौडमध्यें शिरतांना . . .ठीक आहे ?

**पाचू:**—( आजूबाजूला बघून ) कुणी नाहींना इथं ?

**नीला:**— ( आंतील बाजूचे दरवाजे बंद करीत ) काय विशेष नाहींना ? ( काळजीनें ) सांग ना ?

**पाचू :**—( पोलक्यांतील पत्र काढून देते. ) हें बघ, माणिकचें हें पत्र मला टपालनें एका तासापूर्वी मिळालें . . म्हणून मी तुला फोन केला.

**नीला:**—(तें पत्र वाचतांना बेचैन होते. . .घाबरते. . .कपाळ पुसते.)

**पाचू :** —माणिक लिहितोय कीं तूं नीलाच्या अगदीं जवळ ऐस. . . तिच्याशीं आपुलकीनें वाग . . मला वाटतं . . . माणिक कां गेला हें तुला माहित असलं पाहिजे. सांग ना कां गेला तो ?

**नीला :**—( पुन्हा घाम पुसते. )

**पाचू :**—कुठं गेलाय तें तरी सांग.

**नीला:**—खरंच मला माहित नाहीं मुळींच.

**पाचू:**—पण त्याचा पत्रावरून बोध होतोय—तुला सारं माहीत असावं. . .

**नीला:**—( उसासून ) काय सांगूं मी ?

**पाचू :**—( जवळ जाऊन ) माणिकनें मला तुझ्याशीं मायेनें वागा-

यला लिहिलेन् ( तिच्या खांद्यावर हात ठेवीत ) कारण कांहींहि असो. माणिकवर माझा विश्वास आहे. सांगायचं नसलं तर नको सांगूस...मी नाहीं तुला त्रास देत . . झालं ना...अँ ? ( तोंच आंतील दरवाजा वाजतो नीला पाचूला चूप राह्यला खुणवते. दरवाजा उघडते रूपा-जवाहर येतात. )

**रूपा**:—कांहो, कां आलाय् पाचूताई...?

**पाचू**:—कांहीं विशेष नाहीं.

**रूपा**:—माणिकला शोधायला आला असाल.. !

**पाचू**:—तो जसा कांहीं या घरांतच लपून बसलेला असेल ! ( हसते ) सहज आले होते आपली—नीलाला भेटायला—

**जवाहर**:—सहज भेटायला आमची नीली कांहीं रिकामटेकडी नाहीं.

**रूपा**:—असं काय करायचें तें ? सरळ नाहीं का बोलतां येत माणसाला ?

**जवाहर**:—नीलाला नाहीं उद्योग... ( तोंच रूपाकडे बघत नीला जाते. )

**रूपा**:—( चिडून ) खरेंच ! मी म्हणतें, काय उद्योग ठेवलाय् हो तुम्ही त्यांना ? त्यांचं कॉलेज बंद करून टाकलंत गेले सालापासून ! त्यांनीं एकट्यांनीं बाहेर फिरायला जायचं नाहीं कुठें. साऱ्या दिवसभर वाचणार तरी किती माणूस ? पाठची बहिण. तिला बरोबर घेऊन जायचं राहिले बाजूला. निदान तिच्याशीं दोन गोड शब्द बोलतां का कधीं ? त्यांना काय हवं नव्हे—विचारतां का कधीं ? काय करावं बिचाऱ्यांनीं घरीं एकट्या एकट्यानें ? त्यांत आली त्यांची मैत्रीण तर काय झालं ? बसतील थोडा वेळ मोकळ्या मनानं बोलत.

**जवाहर**:—संपलं ? संपलं कां तुझें स्पीच ? कॉलेजमध्यें डिबेटक्लबची सेक्रेटरी होतीस वाटतें तूं ?

**रूपा**:—( हंसत लडिवाळपणानें ) होय, होतें. काय बिघडलं ?

**जवाहर**:—पण या मैत्रिणी बोलतात तरी काय एवढें ? आपल्या नवऱ्यांना नांवें ठेवीत बसतील म्हणावं, तर या दोघींची लग्नें व्हायचीत अजून.

पाचू:—तो आमचा खासगी प्रश्न आहे.

जवाहर:— ( तिरसटून ) कांहीं नाहीं कुणी खासगी बोलायचं आमच्या नीलाशीं समजलं !

रूपा:—( थट्टेनें ) अहो. या पाचूताई थट्टा करताहेत इकडची ! होय ना हो ? समजत कसं नाहीं ? ( त्याच्या गालावर हलकेंच चापटी मारीत ) समजलं ? ( पाचूकडे ) जाहो. त्या पलिकडच्या खोलींत असतील वन्सं !

जवाहर:—तुझ्यापुढें हात टेकले मी अगदीं. ( तिच्या खांद्यावर हात ठेवीत हंसत ) रूपा....रूपा.

पाचू: - ( जातांना दारातूनच ) थँक्स रूपावैनी. ( आंत जाते. )

रूपा:— ( त्याचे खांद्यावरचे हात काढीत त्याकडे पहात ) किती राकट हात आहेत हे इकडचे ?

जवाहर:— विषय बदलूं नकोस रूपा ! कोणालाही भेटूं द्यायचे नाहीं तिला एकटीला अशी सक्त ताकीद आहे बाबांची !

रूपा:—पण पाचू कांहीं पुरुष नाहीं इतकं भ्यायला !

जवाहर:—निदान ती मंगल का भिंगल कोण आहे त्याचें पत्र आणून देईल. नाहीं असें नाहीं.

रूपा:—( चटकन ) आणि तें तुम्ही थांबवूं शकणार नाहीं. हवा तेवढा बंदोबस्त ठेवा. प्रेमिकांना हजार वाटा मोकळ्या असतात. शिवाय तरुणतरुणीच्या भानगडींत पडूं नये माणसानें अगदीं एकेरीवर येऊन... अतिरेक अंगाशीं येतो.

जवाहर:—पण तिच्या अंतिम हितासाठीं तिला समजूं शकणार नाहींत त्या गोष्टी आम्ही पाहायच्या नाहींत तर कुणी ?

रूपा:—पण त्यासाठीं त्यांच्या स्वातंत्र्याचा असा चोळामोळा करून ( हातांतील रुमाल चुरते ) तिला वागविणें आपल्यासारख्या सुशिक्षितांना शोभत नाहीं.

जवाहर:—स्वातंत्र्य ? हं ! तें विवाहितांना देणें योग्य. अविवाहितांना नाहीं.

रूपा:—( उगाच हंसत ) शाब्बास ! शाबास आहे एका माणसाची. ( त्याचे दोन्ही हात आपल्या हातांत धरीत व त्यांना झोंके देत ) पण तें पुरुषांनाच– स्त्रियांना नाहीं... खरं ना ?

रत्ना.—( प्रवेशून ) ( घाईघाईनें आणलेले हार एकामागून एक अशा रीतीनें त्या तीनही तसबिरींवर लटकावून रूपाजवाहरकडे न बघतांच निघून जातो. )

जवाहर:—( जाणाऱ्या रत्नाकडे बघत ) चोर असतात हे नोकर सारे ! बाबा येणार हे कळतांच या तसबिरींवर ताजे हार चढले....जिकडे तिकडे साफसूफ चाललेय अगदीं. पण बाबा नसतात तेव्हां या टेबलावरची धूळसुद्धां निघत नसते.

रूपा:—पण आपण लक्ष देऊन करून घेतलीं कामें तर ऐकणार का नाहींत नोकर लोक ?

जवाहर:—( त्रासिक स्वरानें ) आतां ही घरचीं खरकटीं उपसायची पाळी राहिलीय् माझी...छट् आपल्याच्यानें नाहीं जमायचें तें... बाबा ओरडाओरड करून घेतात तें ठीक आहे. ( तोंच खाली मोटारचा हॉर्न वाजतो. जवाहर–रूपा खिडकींतून पाहतात. जवाहर एकदम परततो.)

जवाहर:—बाबा आले वाटतें ! अग त्यांच्या चहाचं सांगून ठेवलंय ना घरांत महाराजाना ? त्यांच्या चहाला वेळ झालेला खपत नाहीं त्यांना--

रूपा:—( हलकेंच परतत ) वन्संनीं सांगितलंय अगोदरच.

जवाहर:—जा. घेऊन ये जा चटकन्. जा ना.

रूपा:—आणणार आहे रत्ना ! सांगून ठेवलंय त्याला मी ! ( घंटी वाजते. )

रूपा:—( हंसत हंसत दरवाजा उघडते ) आतांच येतांना स्टेशनवरून ?

( मोतीरामशेठ–ओपलसाहेब प्रवेश करतात . . मोतीराम आपली बंदूक तिजोरीला टेकून ठेवतो. )

मोतीराम:—( नेहमीच ओरडून बोलतो त्याप्रमाणें ) होय . . .

बसा साहेब ! जवाहर ! अरे ठीक आहांत ना सारींजणं ? सूनबाई ! ठीक!! नीली कुठें दिसत नाहीं. कुठें गेली पोर ?

**जवाहरः**—आंत बसली आहे मैत्रिणीशीं बोलत.

**मोतीः**—कोण मैत्रीण ?

**रूपाः**—पाचूताई आल्याहेत.

**मोतीः**—अस्से !

**रूपाः**—चहा घेणार ना ?

**मोतीः**—हो तर . . जलदी आणीव हं. जास्त बसायला वेळ नाहीं आतां मला.

**रूपाः**—( जातांना ) रत्नाला पाणी काढायला सांगू कां स्नानासाठीं ?

**मोतीः**—कांहीं नको आतां. रात्रीं जेवणापूर्वींच करीन मी. ( रूपा जाते. )

**जवाहरः**—( बंदूक हातांत उचलून ) शिकारीला जायला सांपडलं कीं नाहीं बाबा ?

**मोतीरामः**—नाहीं . . कुलाबा, रत्नागिरी जिल्ह्यांत रानेंच नाहींत. . तर शिकार करायची कसली ? ( साहेबाकडे ) बरं–साहेबा ! काय बरं मी म्हणत होतों ? ( आपल्या बॅगमधील पुलाचा प्लॅन काढीत ) हा बघा तो पेण–खारवाडा पूल ! तेरा कमानी आहेत त्याला नि. . दोन्ही टोंकांना भराव आहे—

**रूपाः**—(प्रवेशून) इतक्या लांबून यायचं झालं–जरा विश्रांति घेतली तर नाहीं कां जमायचं ? जरा आराम करावा म्हणजे प्रवासाचा शीण जाईल. कामें काय ? आहेतच तीं . . अशानें प्रकृतिबिकृति बिघडायची.

**जवाहरः**—मी तरी तेंच म्हणणार होतों.

**मोतीरामः**—( जवाहरकडे नंतर रूपाकडे बघत ) तुझं बोलणं आवडलें आम्हांला सूनबाई ! ( जवाहरकडे ) पण याला–याला तसें वाटणारच ! ( जवाहर चपापतो. ) स्वतःला काडीचें ज्ञान नाहीं धंद्याचें ! इकडचे तिकडे करायला नको याला. हे कामाचे रगाडे उठविणार कोण ?

नाहीं सायब्रा ! किती वर्षे सांगतोंय मी याला, जरा लक्ष घालीत जा आपल्या धंद्यांत. मातींतून सोनें कसं काढायचें हें शिकायचें वय याचें हें. पण हा आपला चैनी करीत बसतो तो बसतो–नि वर मला म्हणतो आराम घ्या ! अरे बाबा आराम घेत बसलों असतों तर गेल्या महिन्यांत पाताळ–गंगेचा पूल पुरा तरी झाला असतां कां ? हाडाचीं काडें करावीं लागतात तेव्हां कुठें...

**ओपल:**—समजूत आली म्हणजे त्यांनांच पाहिलें पाहिजे सारें कांहीं.

**मोतीराम:**— ( आपल्याच नादांत–त्याला मागची आठवण होते ) किती वेळां सांगूं मी याला साहेबा ! माणसाला काय अशक्य आहे जगांत ? माझंच पहाना. कोकणांतून आलेला बारा वर्षांचा भटक्या पोर. वाटेंत मिळणारीं कामें करीत करीत मुंबऱ्याला आला. तेथें त्याला रेती वाहण्याचें काम मिळालें. नंतर अहमद कागदीनें त्याला आपल्या कल्याणच्या विटांच्या कारखान्यांत नोकरीला ठेवला. तेथें तो मुकादम झाला. मुंबईस येऊन अहमदभाईचें विटांचे सौदे ठरवूं लागला. त्यांत त्या महत्त्वाकांक्षी तरुणाला समाधान वाटेना त्यानें ठाण्याला स्वत:चा विटांचा कारखाना काढला. पहिलीं पांच वर्षे अर्धपोटीं राहून त्यानें परिस्थितीशीं झगडण्यांत काढलीं... सुपारीच्या खांडाचेंही त्याला व्यसन नसल्यामुळें त्याला आपल्या धंद्यांत हळूं हळूं यश मिळत गेलें. पुढें पुढें विटांच्याबरोबर रेती, तोडी, लोखंड, लाकूड वगैरे वस्तूंचा तो व्यापार करूं लागला. त्यांत त्याचा जम बसतांच येथील लहानमोठ्या कंत्राटदाराशीं झगडून तो पी. डब्लू. डी. चीं कामें पार पाडूं लागला. त्यांत त्याला फायदा होऊं लागला. आणि अखेरीस येथील पोखराज कंपनीसारख्या पहिल्या दर्जाच्या कंपनीला तोंड देण्याइतका अव्वल दर्जा त्यानें प्राप्त करून घेतला. इतकेंच नाहीं तर त्यांच्या हक्कांचें म्हणून समजलें गेलेलें पेणखारवाडा पुलाचें कंत्राट मिळवून त्यांत दीडदोन लाख मिळविण्याच्या मनोराज्यांत गुंग आहे तो . . . ( वळून ) नि हाता-तोंडाशीं आलेला त्याचा मुलगा त्याला मदत करायचें सोडून खुशाल आराम करीत बसा म्हणतोय ! खासा न्याय !

**जवाहर:**—( सहज म्हणून ) पण मी केलेलें कोणतेंच काम पसंत

तुम्हाला पडत नाहीं त्यांत तुम्हाला हजार चुका दिसतात त्याला मी काय करूं ?

**मोतीराम:**— म्हणे चुका दिसतात मला–केल्याशिवाय दिसतात वाटते?

**जवाहर:**— राह्यलें आमचें !

**मोतीराम:**– निदान बी. ए. तरी पास होतास तर तेंही नाहीं तिनदां परीक्षेच्या वाऱ्या करून आतां पहातरी पुन्हा एकदां बसून ! नुसता उनाडतोस तो.

**जवाहर:**– मला नाहीं आतां शिकायचें पुढें. कंटाळा आलाय मला अभ्यासाचा.

**मोतीराम:**—पण शिकल्याशिवाय येईल का कोणतीही विद्या.... कोणतेंही काम ?

**ओपल:** - तसेंच कोणतीही कला, हुन्नर.

**मोतीराम:** --हुन्नर म्हणा वाटेल तर...पण कला शिकून पोटं भरत नाहींत-( किंचित हंसतो ) भीक मात्र लागते.

**ओपल:** --( विषय बदलण्यासाठीं ) नीलाताई आणणार आहे वाटतं शेठना चहा ?

**रत्ना:**—( प्रवेशतो–चहा व ट्रे टीपॉयवर ठेवतो. रूपा उठून चहा देते. )

**रूपा:** –( एक बशी पुढें करीत ) चकल्या घ्याना यांतील दोन– ताज्या आहेत.

**मोतीराम:**– नको. मला जरा बरें वाटत नाहीं कालपासून ( समोरच्या नकाशाकडे ) साहेबा ! भरपूर लोखंड आहे आपल्यापाशीं गोडाऊनमध्यें ! त्या स्टॉकवरच पोखराज कपनीपेक्षां पांच टक्के कमीनें टेंडर भरलें मी. आतां या नव्या पुलाच्या बांधकामांत आपल्या शिलकी लोखंडाला दसपट भाव येऊन जाईल !

**ओपल:**—( हळूच ) जुनें वापरून चालेल ?

**मोतीराम:**—चालेल म्हणजे ? चालवायचेंच !

**ओपल:** – चहा घ्याना शेठ ! ( चहा घेत ) तर मग भरपूर होईल प्रॉफिट.

**मोतीराम:**— कसा तो पहा. ( उठून खिशांतील डायरी काढतो. ) येता येतां मी हिशेब केलाय! साडेचार पांच लाखांचा पूल आहे हा. निदान गेला बाजार तेहतीस टक्के तरी मिळालेंच पाहिजेत आपणाला या दिवसांत.

**ओपल:**— रत्नागिरी–कुलाबा जिल्ह्यांतील कामें अजूनपर्यंत पोखराज कंपनीला मिळत असत. अशा स्थितींत पुन्हा आपल्याला शिरकाव कसा मिळाला ?

**मोतीराम:**— ( अभिमानानें ) कसा मिळाला ? ( हंसत ) डिव्हिजनल ऑफिसरला खूष केला–नि कलेक्टर साहेबांना भेटून पंचवीस हजारांचे " डिफेन्स लोन " घेतले मी.

**जवाहर:**— त्या ऑफिसरचं उखळ पांढरं झालं म्हणायचं.

**रूपा:**— चहा टीक झालायना ? आवडला ?

**ओपल:**— एक्सलंट ! पण नीलाताई कुठें दिसत नाहीं ती ? अरे हो ! आतां आठवलें ! सर्दी झालीय तिला नाहीं का ?

**मोतीराम:**— ( काळजीनें ) अगोदर कां नाही बोललां तुम्ही ? (चहा घटाघट पितो ) ( उठून ) निली ! निली ! ! ती समोर नसली म्हणजे मला कांहींच सुचत नाहीं.

**नीला:**— ( आंतून ) आलें आलें ! ( येते. )

**मोती:**— काय ग ? बरं नाहीं वाटत तुला ? नि डोळे असे कां तुझे आज ?

**नीला:**— (खालीं पहात) कांहीं नाहीं होत मला बाबा !

**जवाहर:**— काय होतंय हिला ? तुम्ही नसला म्हणजे घर डोक्यावर घेऊन नाचत असते ही.

**नीला:**— नाहीं बाबा.

**मोती**— ( नीलाजवळ येत ) शहाणी आहे माझी पोर ! खरंच ना कांहीं दुखत खुपत नाहीं तुझं ?

**नीला:**— ( जवाहरकडे बघते–नंतर खालीं मान घालते ) नाहीं.

**जवाहर:**— शिंक आलीय् वाटतं ताईला ! शाबास ! शिंक दाबण्यांत पटाईत दिसते ताई ! खरंच सर्दी झालेली दिसतेय् तिला !

रूपा:—( त्याच्या बाजूला येऊन ) चूप बसा ना जरा.

नीला:—जाऊं मी बाबा ? आंत पाचू बसली आहे एकटीच !

मोती:—जा. मला सुद्धां बोलायला वेळ नाहीं फारसा ! ( नीला जाते ) सूनबाई कांहीं होतंय का हिला ?

रूपा:—कांहीं दिसलें नाहीं विशेष-विचारून पाहीन मी त्यांना.

ओपल:—खरं म्हटलं तर...लग्न झालं म्हणजे तिचें भारावलेलें हृदय तेव्हांच हलके होऊन जाऊन तिचा उदासपणा हां हां म्हणतां निघून जाईल...मला आपलें वाटतें-तें मी सांगितलें...

मोती:—मला समजतं ते सारें ! पण आमच्यासारखे मातब्बर स्थळ मिळालें पाहिजे ना ? आमचा दर्जा संभाळूनच वागलं पाहिजे आम्हाला सोयऱ्यांधायऱ्यांवरून आमची किमत ओळखली जाते आमच्यांत !

ओपल:—पण त्यासाठीं आपण झटून प्रयत्न केला तर वेळ नाहीं लागायचा.

रूपा:—टाका बाई त्यांचें लग्न लौकर उरकून ! घरीं बसून बसून त्यांना कंटाळा येत असेल नाहीं तरी !

जवाहर:—चांगलें प्रेम जमविलें होतें तिनें कॉलेजांत असतांना मंगल नावाच्या तरुणाशीं पण . . .पण . . .

मोती:—मग काय ? ती प्रेम करील त्या वाटेल त्या तरुणाशीं लग्न लावून देऊं तिचं ? शक्य नाहीं तें. चांगलें आपल्या तोलाचें स्थळ पाहिलें पाहिजे तिला...आतां या पणखारपाडा पुलाचें काम दीड दोन वर्षांत संपलें म्हणजे दुसरें कांहीं एक काम करणार नाहीं मी . . . माझ्या नीलीचें लग्न उरकून टाकतों मी.

ओपल:—इतक्या थोड्या मुदतींत कां संपविलें पाहिजे पुलाचें काम ?

मोती:—होय साहेबा ! सांगायला विसरलो मी ! कोंकणांतून वहातुकीचे रस्ते लौकर तयार व्हावेत म्हणून युद्धपरिस्थितीमुळें सरकार घाई करीत आहे. नि मी पण काम पुरें करीन असे बोलून गेलो त्यांना ! उद्याच अर्नेस्ट डिपॉझिटचे पैसे चेकनें पाठवायला हवेत. म्हणजे तारेनें टेंडरला मान्यता

मिळतांच कामाला सुरवात केली पाहिजे आपल्याला, समजलं ? साहेब ! नेहमींप्रमाणें चाल ढकलीचें काम नाहीं हें. जिवाचें रान करायला हवें... चला. गप्पा मारीत बसून उपयोगाचें नाहीं. आपण कारखान्याकडे जाऊं या. ( उठतो. )

**ओपल**:—( अदबीनें ) सांगायला विसरलों मी शेठ. पोखराज शेठचा फोन आला होता आज सकाळीं. आपण केव्हां येणार म्हणून विचारलं त्यांनीं.

**मोती**:—काय काम होतें त्यांचें माझ्याशीं ?

**ओपल**:—विचारलें मी त्यांना पण म्हणाले आपल्याशीच बोलायचं होते.

**मोती**:—पण साहेब ! तुम्ही नाहीं का मोतीराम कोंदणें कंपनीचे भागीदार ? तुम्हीं त्यांना विचारायला हवें होतें. असें करतां तुम्ही. कधीं तुम्हाला, जरूरीच्या गोष्टी समजणार कुणास ठाऊक ! साध्याच गोष्टींत जर मलाच लक्ष घालावें लागलें तर कामाचे डोंगर उठायचे कसें माझ्या एकट्याच्यानें !

**ओपल**:—पुन्हा त्यानीं विचारलें म्हणजे बोलेन मी त्यांच्याशीं.

**मोतीराम**:—( पोषाख करीत—खिडकींतून बघत ) चला ! खालीं मोटार आहेना ? कीं भरलीन् गॅरेजमध्यें त्या फाजील शहाण्या रत्न्यानें ! ( खिडकींतून परत फिरतांना ) कारे जवाहर ! तुला काय होतंय् बाबा ?

**जवाहर**:—( उडवा उडवीनें ) छे. कांहीं नाहीं

**मोतीराम**:—महिन्याचा भत्ता पुरतो नारे ? ( येरझारा घालीत—खुषीनें ) मारा मजा ! नशिबांत आहे तोंवर घ्या चैन करून. ( थांबतो ) आमच्या नशिबांत नव्हतें तें. निदान तुम्हा मुलांना मिळतेंय तें—एवढें तरी समाधान आहे मला. ( जवाहरजवळ जाऊन ) आतां हा नवा पूल मी उठविला कीं सर्व व्यवहार घालणार आहे तुझ्या गळयांत, नि बसणार आहे हरि-हरी म्हणत म्हातारपणीं... तें जमलें नाहीं तर होईन म्युनिसिपॅलिटीचा प्रेसिडेंट... नाहींतर मुंबई असेंब्लीसाठीं उभा राहून निवडून येईन मी...

पाण्यासारखा ओतल्यावर माणसाच्या हातीं लागणार नाहीं अशी वस्तु नाहीं या जगांत. . .

**जवाहर**:–(कंटाळून) भरपूर यश लाभो तुम्ही हातीं घेतलेल्या कामांत–

**मोतीराम**:––कां रे बाबा ? असा ओढलेला आवाज कां तुझा ? काय कमी आहे रे तुला ? (जवळ जात) दंड बैठका घालतोस कीं नाहीं ? अरे प्रकृति ठीक असली म्हणजे मनुष्य जग जिंकू शकतो. ( साहेबाकडे बघत ) साहेबा ! याला चेक देत होतांना वेळेवेळेवर ?

**ओपलः**––होय शेटसाहेब ! यांना मी आठवड्या आठवड्यानें चेक देई पण परवांच ह्यांनीं एकदम महिन्याचा चेक मागितला. तो मी त्यांना दिला नाहीं म्हणून ते नाराज आहेत माझ्यावर . . .

**मोतीराम**:––अस्से होय ? ( जवाहरला ) अरे इतके मनाला लावून काय घ्यायचे ? स्वत: चांगलाच कमवता हो. नि मग हव्वे तेवढे पैसे खर्च कर. . .

**जवाहर**:—( तिरसटून ) ते कोणी मला सांगायला नकोय्.

**रूपा**:––असें काय बोलायचें तें ?

**मोती**:— ( जवाहरकडे बघत–रागानें ) डोकेंबिकें फिरलेंय काय तुझें ? नीट कांहीं समजुतीनें सांगावं तर ऐकायची संवय नाहीं शुंभाला ! ! ( दरवाजांतून ) रूनबाई–संभाळा याला. ( ओपल जायला निघतो. )

**रूपा**:––थांबायचं जरा ! ( मोतीराम थांबतो ) आज सकाळपासनं माणिक कुठें निघून गेलेत त्याचा पत्ता नाहीं.

**मोतीराम**:—कां गेला ? कांहीं कारण ?

**रूपा**:––कुणाला कांहीं सांगून गेले नाहींत ते.

**मोतीराम**:—जाऊं देत ..ज्याचें नशिब त्याच्याबरोबर...आपल्याच्यानें इतरांचें जितकें भलें करतां येईल तितकें करीत असावं...नाहींतरी अखेरीस भिकाऱ्याला भिकेचेच डोहाळे आठवले नाहींत तर नवल. (जातांना) जवाहर...पोलीसांत फोन करून ठेव...( जातात. ओपल जातो )

**जवाहर**:—( उठून चिडक्या स्वरांत) तेच शब्द ! तोच उपदेश ! तोच व्यवहार ! नि तोच तो आपल्या मुलाचे कान उपटू पाहाणारा चढेल

बाप...जरा कसलें नाविन्य मिळेल या घरांत तर शपथ! शिव्या देण्यांत तरी नवीनपणा असावा ..डोकें फिरून जायची पाळी आलीय् अगदीं.

रूपाः—( हंसत ) हवं असल्यास दुसरं लग्न करावं गडे! माझी कांहींच हरकत नाहीं हं...म्हटलं कांहीं दिवस तरी नाविन्याची उणीव भासणार नाहीं एका माणसाला...( लाडानें ) अलिकडे म्हणे करमणुकीसाठीं करतात पुरुष दोन दोन बायका!!

जवाहरः—रूपा. रूप! रूप!! तुला नाहीं उद्देशून बोललों मी. घरांतील या कुबट वातावरणानें मी बेजार झालोंय अगदीं.

रूपाः—असें काय तें.. तुमचेंच ना घर हें?

जवाहरः—नाहीं रूपा. नाहीं! ( भावनातिरेकानें ) तूं जशी माझी आहेस तसे ठाण्याचा हा प्रख्यात मोतीमहाल माझा नाहीं... मुंबईंत उठविलेला जवाहरमॅन्शन माझा नाहीं. या तिजोरीची किल्ली माझी नाहीं. फार काय-सोन्याचा भाव वाढणार म्हणून बाबांनीं तीन वर्षापूर्वी खरेदी करून ठेवलेल्या सोन्याच्या किती विटा आहेत या तिजोरींत, हें सुद्धां मला माहित नाहीं.

रूपाः—सध्या सोन्याचा भाव पंच्याऐशी रुपये झालाय, तेव्हां तोंडाला पाणी सुटलंय वाटतं इकडच्या?

जवाहरः—माझ्या तोंडाला सुटून काय उपयोग. बाबांच्या बोळक्याला सुटायला हवंय ना!

रूपाः—इतकं का तें मामंजीवर चिडायचें?

जवाहरः—कां नको चिडूं? बाबांच्या कारखान्यांत अगदीं पहिल्यापासूनचा तो नोकर–ओपलसाहेब! त्याला बाबांनीं गेले सालीं दोन आण्याची भागीदारी देऊन शेठ बनविला. त्याला माझी हरकत नाहीं. पण तो जेव्हां पदोपदीं माझा अपमान करून माझ्यावर दादागिरी गाजवतो तेव्हां तो सारें कांहीं बाबांच्या संमत्तीनें करतो असें मनांत येतें – त्यावेळीं असा राग येतो बाबांचा—

रूपाः—पण मामंजीच्या गैरहजेरींतच ना साहेब तसें वागतात? मामंजीनीं सांगितल्याप्रमाणें ते न वागून करतील काय? हुकुमाचे ताबेदार ते!!

( हंसतच ) तुमच्या अंतिम हितासाठीं–तुम्हाला समजत नाहींत त्या गोष्टी त्यांनीं पहावयाच्या नाहींत तर कुणी ?

जवाहर:— ( बोलण्याची खोंच समजत नाहीं. ) आणि आतां बाबा, दीडदोन वर्षे त्या पेणच्या डोंगरांत तंबू ठोकून नवा पूल उठवीत बसणार ! नि हा हा साहेब माझा बाप म्हणून इथं माझ्या डोक्यावर मिऱ्यां-वाटीत बसणार ?

रूपा:—अय्या...म्हणून का नाराज व्हायचं झालंय् ?

जवाहर:—तुला काय ? बाप जिवंत असतांना थोरल्या मुलाचे काय हाल होतात याची कल्पना तुम्हा बायकांना कुठची असणार ? पावलोपावलीं अपमान सहन करावा लागतो.

रूपा:—( कंटाळते–एकदम निर्णय घेऊन ) चला. उठा आतां. पुरे झाले हे निराशेचे चोजले. सुदैवानें इतकें मिळतंय—आणखी काय हवंय हो ? आपल्या भोंवतालच्या दीन दुबळ्या गरीब जनतेकडे तरी बघा जरा.

जवाहर:—( आपल्याच नादांत ) काय हवंय ? ( श्वास सोडतो ) स्वातंत्र्य हवंय् मला—

रूपा:—पण वन्संना मिळतंय् का घरांत ?

जवाहर:—( डोळे वटावरतो )

रूपा:—( उपरोधिकपणानें हंसत ) मला मिळतंय् का आपल्याकडून ?

जवाहर:—मला जास्त कांहीं ऐकायचं नाहीं तुझं. ( जाऊं लागतो )

रूपा:—आत्तां का ? करतांना चांगली बी. ए. झालेली बायको केलीत. तिला तशी वागवतां का ?

जवाहर:—“ आणखी कसें ” वागवायचें तुला मी ?

रूपा:—( हसत ) पिंजऱ्यांत ठेवलेल्या सुंदर पोपटाला जग काय वाईट वागवतें ? नाहींतरी खेळायचीच वस्तु ती !

जवाहर:—पुरे तुझी ही वटवट ! ( रागानें आंत जातो )

रूपा:—( तो गेला त्या दिशेकडें बघत ) त्याच गांवच्या बोरी— नि त्याच गांवच्या बाभळी ( उपेक्षेनें स्मित करत–कॉल बेल वाजवते )

रत्ना:—( येऊन ) जी !

रूपा:--नजरेनें त्याला चहाचें सामान न्यायला हुकुम करते-( तो तें घेऊन जातो )

रूपा: - ( रेडीयो ऑन करते. )

पाचू: - ( प्रवेशते ) कुणाचं गाणं लावता आहां वैनी ( नीला येते )

रूपा:—कुणाचं असं नाहीं. पाहते आहे लावून- लागल तें ऐकायचं!

रेडिओ: —यह बंबई है! दोसो चौव्वालीस पॉईंट चार आठ मिटर-पर अब मराठीमें बंद रेकॉर्ड सुनिये--

पाचू:--मराठी रेकॉर्डस् आहेत तर--( बसते )

नीला:--( रूपाच्या शेजारीं बसते ) कुठं गेलाय दादा--वैनी?

रेडिओ: —सख्या सोडना-राया सोडना-तुझ्या हाताची मिठी जरा सोडना--( इत्यादि )

रूपा:--( गाणें संपायच्या वेळेला नाचण्याचे सौम्य हावभाव करते. )

पाचू: - ( खूप झालेली दिसते )

नीला: -(गाणें पुरं व्हायच्या आंतच-एकदम) बंद कर तें वैनी!

रूपा: -( रेडीयो बंद करते ) काय झालं वन्सं?

पाचू: - हे गं काय असं?

रूपा:—अशा काय करतां तुम्ही?

नीला:—( उठून-दोन्ही हात कानशिलावर ठेवीत ) मला नाहीं समजत मी काय करतेय-तें. ( थांबून ) असलें हे सुंदर गाणें-गोड मधुर आलाप ऐकून तुमचीं हृदयें फुलून नाहीं येत? एवढ्याशा छातींतून तें बाहेर उसळी मारूं लागतय असें नाहीं वाटत तुला? वैनी तुला?... मला तर वाटतं. तें बाहेर काढून त्याच्या पाकळ्यान् पाकळ्या खुडून टाकाव्यात-नि टाकावा त्याचा चोळामोळा करून एकदांचा ( एकदम बसते )

रूपा: -( जवळ जाऊन) तुमचं हृदय फार कोमल आहे वन्सं-- अतिमानवाचें आहे तें—

नीला: - मग मानव असतो तरी कसा?

पाचः—आजूबाजूच्या जगांत दिसत नाहीं तुला?

**रूपा**:—दिसतो आपलीं शिंगें सरसावून दुसऱ्यांचा पाठलाग करणारा !

**नीला**:—कां ? कां म्हणून मानव असा वागतो ?

**पाचू**:—( सहज ) अगम्य आहे तें.

**रूपा**:—अगम्य नाहीं . . . मी सांगतें कां तें— स्वतःसाठीं, स्वार्थासाठीं !

**पाचू**:—( थांबून ) पण वैनी-माद्यांना नसतात शिंगे !

**रूपा**:—म्हणून शेपट्या नसतात असें नाहीं.

**पाचू**:—( मोठ्यानें हसतें ) आणखी एक गोष्ट असते माद्यांपाशीं—आपल्या मोहक सौंदर्यानें नटून, पुढें पुढें पळत जाणाऱ्या सुंदरीमागें आपला जीव तोडून धापा टाकीत धांवणारा पुरुष जर कोण्या चित्रकारानें दाखविला तर तें चित्र किती सुंदर दिसेल नाहीं ?

**रूपा**:—आणि ती सुंदरी हातीं लागतांच भक्षक वृत्तीनें तिचा चोळामोळा करून, दुसरीमागें धावूं इच्छिणारा असंतुष्ट पुरुष दाखविणारें असें दुसरें एकादं चित्र तितकेंच मनोहर दिसतें नाहीं ? ( हसते ) जाऊंद्या—का आलां होता तुम्ही आज ? बोलला नाहीं ?

**पाचू**:—म्हटलं घरजावई-पिक्चर लागलय्—नीला येती तर घेऊन जाणार होतें बरोबर—दुसऱ्यानंदा पाहण्याजोगं चित्र आहे तें...नाहीं ?

**रूपा**:—त्यांना एकट्यांना नाहीं पाठविणार कुणी ! (विचार करून) असं करूं या का ? आज मामंजी आनंदांत आहेत. रात्रीच्या शोला तुम्ही परभारें या. मी घेऊन येतें वन्संना इकडच्या बरोबर—

**नीला**:—वैनी ! कशाला उगीच माझ्यासाठीं ? तुम्ही दोघंजणं जा आपलीं—

**रूपा**:—नाहीं. वा. तुम्हाला आज आम्ही नेणारच—

**नीला**:—पण दादाला आवडेल का मी बरोबर आलेली ?

**रूपा**:—तें पाहिन मी-

**नीला**:—पण नकोच बाई.

**पाचू**:—ठरलं ना ? बराय् मी जाऊं ?

रूपाः—माझ्या कडून नाहीं व्हायची कसूर !

पाचूः—(थट्टेनं) अगदीं मुठींत ठेवलेले दिसतंय तुम्ही पतिराजांना !

रूपाः—माणिकरावांशीं तुमचा प्रेम विवाह व्हायचाय ना ? एवढं तरी शिका माझ्यापासनं. ( हसते )

पाचूः—( सहजच ) पण आज कुठाय त्याचा पत्ता.

रूपाः—कांहो ? निराश झाला वाटतं इतक्यांतच !

पाचूः—छे-छे-( हंसत ) जीवनाची सुरवात व्हायच्या आंतच मी निराशेनें घायाळ होऊं–? काय म्हणून तें ?

नीलाः—भाग्यवान् आहेस बाई पाचू !

पाचूः—त्यांत कसलें आलंय भाग्य ?

नीला—( चटकन् विषय बदलून ) नाहीं म्हटलें माणिक बी. ए. झाल्यावर तो मुंबईस राहणार–तेव्हां तुमच्या भेटीगांठीना आडकाठी राह्यची नाहीं कुणाची—

रूपाः—आईबापांनीं समजूतदारपणानें आपल्या मुलांमुलींच्या प्रेम-विवाहाला मान्यता दिली म्हणजे लग्नाइतकी सोपी गोष्ट नाहीं दुसरी !

पाचूः—आमचा मिश्रविवाह होणार आहे म्हणून माझी आई नाखूष आहे जरा ..पण म्हणते काय...इतके दिवस तुला प्राणापलीकडे आवडणारा, तुला पूज्य वाटणारा माणिक, केवळ आपल्या जातीचा नाहीं म्हणून बाई मी वाईट कसा म्हणूं त्याला ?

रूपाः—भारीच समजूतदार दिसतेय तुमची आई !

पाचूः—त्या दृष्टीनें मात्र मी भाग्यवान आहे खरी.

नीलाः—( निःश्वास सोडीत ) बाकी पाचू...वैनीचा प्रेमविवाह झाला नसला तरीसुद्धां दादाशी ती अगदीं आनंदांत असते.

रूपाः—साखर पडो तुमच्या तोंडांत वन्सं

पाचू :—का हो ?

रूपा :—कांहीं नाहीं ! आमच्या वन्सं भाबड्या आहेत–भोळ्या आहेत. फुलें दिसतात त्यांना–त्यामागील कांटे दिसत नाहींत त्यांना.

पाचू :—बराय्, जाते मी.

**नीलाः**—( उठून ) भेटशील केव्हां पुन्हां ? माणिकचा पत्ता लागला तर फोन कर हं.

**रूपाः**—नि नमस्कार सांगा हं त्यांना आमचा. अगदीं साष्टांग सांगा.

**पाचू**:—म्हणजे मला प्रत्यक्ष घालायला लागणार साष्टांग नमस्कार. त्यासाठीं ( हंसते ) बराय् . . . चियरों . . . ( जाते )

**रूपाः**—( हळू हळू गंभीर होत ) वन्सं कांहीं दुखतय कां तुमचं ?

**नीलाः**—कांहीं नाहीं ग !

**रूपाः**—तुम्ही अशा कां वागतां अलिकडे !

**नीलाः**—कशी वागते मी ?

**रूपाः**—माझ्याशीं तुम्ही मोकळेपणानें बोलावें इतका तुमचा विश्वास मी संपादन करूं शकलें नाहीं. खरें आहे तें ... पण गेले १५।२० दिवस पहातेंय मी. तुमच्यांत कांहीं निराळाच फरक झालेला दिसतोय.

**नीलाः**—म्हणजे ( घाबरून ) मी काय केलं गेल्या पंधरावीस दिवसांत ?

**रूपाः**—भिऊं नका अशा ! तुम्ही कांहीं केलंय् असं कुठं म्हणतेय ? पण-पण तुम्हाला कुणाची भीति तर वाटत नाहींना ?

**नीलाः**—नाहीं.

**रूपाः**— मी तुमची थोरली बहीण म्हणून बोलाना वन्सं तुम्ही माझ्याशीं... ! भिऊं नका— आजपर्यंत तुमच्या एकलेपणाच्या दुःखाची जाणीव झाली नव्हती मला. मी आमच्या सुखाच्या झगझगाटांत आणि खेळ खेळण्याच्या उन्मादांत तुमचें कष्टी जीवन पाहूं शकलें नाहीं. तुमची उपेक्षा होतेय घरांत – तुमची कुचंबणा होतेय हें माझ्या नजरेंतून सुटलें नाहीं- खरें ना हें ?

**नीलाः**— ( डोळ्यांत दाटणारे अश्रू आंवरीत ) तसं नाहीं वहिनी. रूपा तिचें डोकें आपल्या छातीवर घेते. तिला गोंजारते. नीला एकदम हुंदके देते. )

**रूपाः**—उगी. उगी. (थांबून) त्यांनीं तुम्हाला मारलं हे फार गैर केलं. तुम्ही तें मामंजींना सांगायला हवं होतं.

नीला—( रँडं आंवरीत ) का दुसऱ्याच्या चहाड्या करा! म्हटलं होईल तो त्रास आपण सोसलेला काय वाईट? नि अशानें का दादा सिधा होणार आहे? शिवाय बाबा त्याच्यावर ओरडत असतात. माझ्या सांगण्यानें ते दादावर जास्त संतापले असते. मग त्याला किती वाईट वाटलं असतं, नाहीं? नि मग तुलाहि वाटलें असते वाईट—खरं ना?

रूपाः—थोर हृदयाच्या आहां तुम्ही वन्सं! इतका भोळेपणा बरा नव्हे!

जवाहरः—(स्नानाच्या लॉंग कोटामध्यें प्रवेश करतो) हॅलो रूप... रूपा— ( बघत ) पावसाची सर अजून लागतेच आहे वाटतं?

रूपा—( मुद्दाम खेळकरपणानें ) अय्या! आत्तां या वेळीं स्नान?

जवाहरः—रत्नानें बाबासाठीं केला होता बाथ तयार...म्हटलें आपण उरकून घ्यावें...स्नान काय-केव्हांहि करावें!

रूपाः—गेले ना आतां खुळचट विचार डोक्यांतून साफ धुवून? हुपारी वाटत असेल आतां चांगली – खरं ना?

जवाहरः—रूप–! थट्टा करतेस तूं माझी?

रूपाः—ती काय म्हणून?

नीलाः—( उठून ) जाते मी.. ( जाते )

रूपाः—म्हटलं बरं वाटत असल्यास आज आपण घरजावयाला जाऊं या कां?

जवाहरः—बाबा घरीं आले आहेत ना?

रूपाः—आहो हो हो...भारीच बाई अज्ञाधारक सालस इकडचे हे आमचे. दृष्ट तरी काढूं द्या बाई! ( तसे हावभाव करते )

जवाहरः—( प्रेमातिशयान ) किती गोड बोलतेस तूं रूपा...पुन्हा एकदां बोल पाहूं अगदीं असेंच ( जवळ जातो )

रूपाः—( दूर होते ) सांभाळा हां! दिवाणखाना आहे हा. भान विसराल...!

जवाहरः—पती पत्नीला जगाची लाज बाळगायचें कारण नाहीं. वाटल्यास जगानें आपले डोळे मिटून घ्यावेत आम्हाला बघून! ( तो तिला कवटाळण्याचा यत्न करतो )

**नीला:**—( प्रवेश करते–त्या दोघांना अलिंगनांत बघून चटकन् जाते. )

**रूपा:**—अंहं–हें काय हें? ( विरोध करीत )

**जवाहर:**—काय. हें काय हें? ( हसतो– )

**रूपा:**—( मुटका होतांच दूर होते–रेडिओकडे तिचें लक्ष जातें–चाळा म्हणून ती ऑन करते ) आतां बघा हं...दुरूनच बोला.

**जवाहर:**—काय बोला?

**नीला:**—( प्रवेश करून ) वहिनी क्षमा करा मला. मी नाहीं यायची सिनेमाला.

**रूपा:**—म्हणजे?

**जवाहर:**—( रूपाला ) शाबास तुझी! ही कां येणार होती आपणां दोघांबरोबर बीचमें मेरा चांदभाई? नि घरजावई बघायला–? आटोपलेंच म्हणायचें!

**रूपा:**—( संतापते ) अगदींच कसें तुम्ही ताळतंत्र सोडून बोलतां? नि ते वन्संच्या देखत? ( नीला जाते ) वन्सं थांबाना. थांबा जरा किती वाईट वाटलें त्यांना. वन्सं थांबा. मी आलें...कांहीं माणुसकी–दया माया तरी? ( चटकन् नीला मागून जाते. )

**जवाहर:**—च्यायला! रागावली वाटतं ही...बायकांची जात पाऱ्या-सारखी चंचल असते असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. घेऊं म्हटल्यास हातांत सांपडायची नाहीं. ( समोरच्या आरशांत बघत केस विंचरतो )

रेडियो ( सुरू होतांच जवाहर चमकतो ) यह बंबई है! डॉक्टर आर. पी. परांजपे "सुशिक्षित स्त्रियांचे प्रश्न' पर मराठी मे बहस करेंगे–डॉक्टर आर. पी. परांजपे...

**जवाहर:**—(एकदम जातो) घरें म्हणजे सभागृहें वाटतात यांना... ( रेडियो बंद करतो .. ) आम्हाला शिकवताहेत हे...! ( पडदा पडतो )

## ( पहिला अंक समाप्त )

## अंक २ रा.

[ स्थळ:— ठाणें. ]

( वेळ दुसऱ्या दिवशींची सायंकाळची ५॥ वाजल्यानंतरची. पहिल्या अंकांतील दिवाणखाना. पूर्वीसारख्याच स्थितींत आहे. पाचू पदरानें डोळे टिपीत आंतील बाजूनें रूपासह प्रवेश करते. )

**पाचू:**— गरिब बिचारी! आतां तुम्हीच तिला आईच्या ठिकाणीं आहां. ती जिवंत असती तर....

**रूपा:**—आतां तो विचार नको. वन्संना अगदीं मायेनें वागवीन मी. तुम्ही नका काळजी करूं. मला समजत कां नाहीं? अशा स्थितींत मलाच बघितले पाहिजे त्यांचें सारें कांहीं.

**पाचू:**—बरं तर! मी उद्यां सकाळींच जाईन मुंबईला. पहाते शोधून माणिकना कुठें भेटले तर.

**रूपा:**—( तिच्या जवळ जात ) कांहींही करा नि त्यांना हुडकून काढा...त्यांचा तो चांगले कमवते झाल्याशिवाय लग्न करायचें नाहीं हा हट्ट चालूं देऊं नका. भलत्याच भीतीनें पछाडलेले असतात अलिकडचे तरुण!

**पाचू:**—पण. . .आम्ही लग्न केल्यावर कोल्हापुरास बाबांच्या ओळखीनें कंपनीची शाखा काढून राहूं लागलों, म्हणजे नीला आमच्याकडे येईल कीं नाहीं. शंका वाटते मला. मोतीरामशेट पाठविणार नाहींत तिला.

**रूपा:**—त्यांची माझ्यावर माया आहे! पाहीन मी वन्संना तुमच्याकडे पाठविण्यासाठीं काय हिकमत लढवायची ती.

**पाचू:**—ती आली पाहिजे. बाकी सर्व कांहीं आम्ही बिनबोभाट पार पाडूं.

**रूपा:**—त्याची शंका नाही मला... म्हणून तर तुम्हालाच मी हा उपाय सुचविला. ( थांबून ) तें कळल्यापासून चैन पडेना कसें तें! रात्रभर

झोंप नाहीं... म्हणून तुम्हाला बोलावून घेतलें.. तुम्ही उदार हृदयानें मी सुचविलेलें मान्य केलें...तुमचें औदार्य...

**पाचू:**—( मधेंच ) त्यांत कसलें आलंय औदार्य ? नीला माझी शाळामैत्रीण. आम्ही दोघीजणीं एकाच कॉलेजांत शिकत होतो. तिच्या-साठीं मी कांहीं थोडेफार केलें, तर तें माझें कर्तव्यच ठरेल.

**रूपा:**—पण जपायला पाहिजे बरं का ? कुणाला कळतां कामा नये. मामंजी आकाशपाताळ एक करतील. अन् तिकडे तर... हातांत कोलीत मिळायची खोटी. . . लावीत बसतील आग लहर येईल त्याला.

**पाचू :** –तुम्ही मुळींच सुद्धां काळजी करूं नका. माझ्याच्यानें जेवढें होईल तेवढें मी माझा जीव धोक्यांत घालून पार पाडीन. बराय्, जाऊं मी ?

**रूपा:**—बराय्...पण हें पहा पाचूताई ! मी काल पिक्चरला आलें नाहीं म्हणून तुमची निराशा झाली असेल. तुम्ही माझ्यावर रागावला तर नाहीं ?

**पाचू:**—मुळींच नाहीं. अन् आतां सर्व कळल्यानंतर कांहीं वाटून घेण्याइतकी का मी खुळी आहे ? ( जातांना–परत फिरून ) पण...काय हो वहिनी ! नीला जरा अबोलकीच आहे...कसें काय तुम्हाला तिनें सांगितलें सारें ?

**रूपा:**—ती पिक्चरला येणार नाहीं म्हणून म्हणाली. तेव्हां मी तिला त्याचें कारण विचारलें. पण ती बोलेचना कांहीं केल्या ! जेवणें झाल्यावर मीच त्यांच्या खोलींत गेलें. त्यांच्याशीं बोलतां बोलतां त्यांना काय होतंय म्हणून विचारलें. तों रडायलाच लागल्या एकदम ! मी त्यांना बिछान्यावर निजवलें–त्यांचें डोके मी माझ्या मांडीवर घेऊन गोंजारलें... त्या जास्तीच रडूं लागल्या !!

**पाचू:**—अयाईऽऽऽ ! बिचारी !!

**रूपा:**—बराच वेळ त्या पडून राहिल्या होत्या तशाच ! मी सहज म्हटलें उद्यां डॉक्टरना बोलावूं का ? कांहीं दुखत असलें तर...पण माझं हे विचारणें पुरें होतंय् तोंच त्या नको नको वहिनी–डॉक्टरना नको बोलावूंस–

तुझ्या पायां पडतें मी असें म्हणाल्या...तेव्हां मी काय होतंय तर मग तुम्हाला असें मुद्दामच त्यांना विचारलें.

पाचू:—( जिज्ञासेनें ) काय उत्तर दिलें तिनें ?

रूपा:—म्हणाल्या......

रूपा:—म्हणाल्या, मला आईची आठवण झाली. मी म्हटलें, मीच तुमची आई नाहीं कां आतां ? त्यांनीं माझ्या गळयांत हात घातले . . . आणि...मीही त्यांना मनापासून कवटाळलें . . . अगदीं पोटच्या मुलीप्रमाणें कवटाळलें त्यांना मी. माझ्या ममतेच्या गोड गोड बोलण्यानें त्यांना विश्वास वाटूं लागला माझा. मी विचारलेल्या प्रश्नांना हळू हळू त्या उत्तरें देऊं लागल्या... त्यांच्यावरचें संकट दूर व्हावें म्हणून माझ्या प्राणाचीही पर्वा करणार नाहीं असें मी त्यांना वचन दिलें. तेव्हां कुठें त्यांनीं स्फुंदत स्फुंदत खरें तें सांगितलें. आणि नंतर त्या ज्या रडायला लागल्या त्याला सुमारच राहिला नाहीं . . . मी शांत केलें त्यांना ! "मला वाचीव वैनी !" असें म्हणून त्या माझ्या पाया पण पडूं लागल्या.

पाचू:—भोळी बिचारी नीला ! ( जातां जातां ) आणखी कांहीं बोलली ती ? ( थांबते )

रूपा:—मी त्यांना दुसरेंतिसरें कांही एक विचारलें नाहीं. त्यांना लाजविण्यानें त्यांचें संकट थोडेंच दूर होणार होतें ? त्यांना आगीच्या फोंफाट्यांतून काढणें हेंच आपलें पहिलें काम असलें पाहिजे !

पाचू:—तें तर खरेंच ! ( जाऊं लागते )

रूपा:—कसेंही करा, अन् महिना पंधरा दिवसाच्या आंत तुम्ही आपलं लग्न उरकून घ्या. दुसरा उपायच दिसत नाहीं मला.

पाचू:—त्यांचा पत्ता लागला तर उद्यां दुपारपर्यंत सांगते मी नक्की काय तें. लहानपणापासून त्यांनीं स्वावलंबनानें शिक्षण घेतलें. कष्ट करीत शाळेंतील शिक्षण पुरें केलें त्यांनीं. कॉलेजसाठीं तुमच्या शेटसाहेबांच्या आश्रयाला राहून चार वर्षे काढलीं. स्वभावाचे गरीब असल्याशिवाय कां हें जमेल कोणाला ? म्हणून म्हणते, नाहीं म्हणायचें नाहींत मला. ( दरवाजाजवळ जाते. )

रूपाः—देव करो नि तुम्हाला यश येवो. ( पाचू जाते )

जवाहरः—( बाहेर जाण्याचा पोषाख करून येतो ) कोण गेलं ते आतां तिकडून रूपा ?

रूपा: —( गोंधळून ) पाचूताई आल्या होत्या ( लडिवाळपणानें त्यांचा टाय सारखा करीत ) म्हणजे मीच त्यांना बोलावून घेतलें होतें. म्हणजे काल सिनेमाला जातां आलं नाहीं ना त्यांच्याबरोबर आपल्याला ? म्हणून दिलगिरी प्रदर्शित केली मी. ( मान वेळवून ) आतां मामंजींना बरं वाटतय ना ?

जवाहर:— त्यांत काय एवढें तिच्याशीं दिलगिरी प्रदर्शित करण्यासारखें आहे ? नाहींतरी मी तुला म्हणतच होतो कीं शोला चल म्हणून.

रूपा: —( त्याच्या कोटाच्या कॉलरवरून हात फिरवीत ) पण वन्संना घेऊन जायचं ठरविलं होतं मी मनांत.

जवाहर:—अन् अर्ध्या रात्रभर तिच्याशीं बोलूनहि, नाहींना तिची समजूत घालतां आली तुला ? ती अलिकडे फार लाडावली आहे, तिचा मूर्खपणा माझ्या आड यायला लागला आहे.

रूपाः—कांहींतरीच कां भलती समजूत करून घेतां ?

जवाहर:—भलती समजूत ? पोखराज कंपनीच्या आणि आमच्या कंपनीच्या कॉंट्रॅक्टसबाबतचे आमचे संबंध ठीक नाहींत, आमचा धंदा जोरानें चालतो, आम्ही जेथें पाय टाकूं तिथें आम्हाला यश येतें, म्हणून ते आम्हाला पाण्यांत पाहतात. त्या कंपनींतील हेड्क्लार्कची मुलगी ही पाचू. आमच्या येथें नीलाची मैत्रीण म्हणून येते, अन् म्हणे आमच्याकडे राहणाऱ्या माणिकवर प्रेम करते ती, म्हणून ती रोज येते. तसें असेल तर घाला म्हणावं कॉलेजच्या आवारांत हवा तेवढा धुडगूस; आमच्या येथें नको. मला तर हें लक्षण ठीक दिसत नाहीं. त्यांच्या डावाला बळी पडूं नये म्हणून नीलाला सरळ करायला हवी-वठणीवर आणायला हवी अगोदर.

रूपा: — मी म्हणते, आम्हां बायकांना काय करायचय् पुरुषांच्या कारवायांत पडून ? माणिकवर पाचूचं प्रेम असलं, अन् त्यासाठीं जरी त्या येत असतील, तरी–

**जवाहरः—** ( मध्येंच उतावीळपणें ) जगाच्या मागें शंभर मैल आहेस तूं. हल्लींच्या बायकांना तूं ओळखलें नाहींस! पुरुषांपेक्षां जास्त कारस्थानी असतात त्या! सध्याचें महायुद्ध बायकांनींच पेटविलें अन् त्यांनींच चालविलें आहे तें.

**रूपाः—** येऊन जाऊन काय करणार ही पाचू एवढें कारस्थान? मामंजीच्या धंद्याचा पायाच भक्कम आहे मुळांत. उगीच का भ्यायचें?

**जवाहरः—**भोळी आहेस तूं. तुला नाहीं समजायचे तें. ( जाऊं लागतो )

**रूपाः—**बसा ना? ( त्याला बसवून त्याच्या खिशांतील कंगवा काढून त्याचा भांग नीट पाडते ) आज एकटेसे चाललां बाहेर? कंटाळा आला वाटतं माझा? नाद तर नाहींना लागला इकडे कुणाचा? ( हसत ) कोण बरं एवढी भाग्यवान् आहे?

**जवाहरः—** चालूं द्या तुमची थट्टा! रात्रीं नीलीशीं बोलत बसली होतीस—आतां तास झाला तरी पाचूशीं गप्पा चालल्या होत्या तुझ्या! वाट किती पाहायची माणसानं! म्हटलं एकट्यानेंच जावं बाहेर— अन् टाकावी नजर आपल्या विटांच्या कारखान्यावर! हळू हळू बाबा म्हणतात त्याप्रमाणें तें शिकलं पाहिजे नाहीं तरी.

**रूपाः—** ( हसत ) पण साहेब! आज रविवार आहे म्हटलं. आजचा आपला रुबाब पाह्यला चिटपाखरूंसुद्धां असणार नाहीं कारखान्यामध्यें!

**जवाहरः—** च्यायला — विसरलोंच की — वारांचीं नांवेंच लक्षांत राहात नाहींत माझ्या. बरं तर, आतां निघालोंच आहे, तो कोप्रीकॉलनीवरून चक्कर मारून येतो एक.

**रूपाः—**पण मोटारींत बरोबर आपली बायको नाहीं म्हणून लोक हसतील ना?

**जवाहरः—** ( हसत ) हसूं देत. पुढें धंदा करायला लागलों म्हणजे काय तुला काखोटीस मारून हिंडत जाऊं वाटते?

रूपा:—( आपल्या दोन्ही हातांत त्याचा चेहरा धरीत ) कोठून शिकला एवढें हें शहाणपण आज ?

जवाहर:— वा: ! म्हणजे मी मूर्ख होतो वाटते ?

रूपा:— नाहीं म्हटलं— आपल्या लाडक्या बायकोला अशी थोडी थोडी मोकळीक देत जावी गडे !

जवाहर:— विनंति मंजूर ( जाऊं लागतो. )

रूपा:— पण खरंच, कोठें निघाला ? सांगाना.

जवाहर:— खरं सांगू — खरं सांगू ? आपले स्वीमिंग कॉस्टयूम् मधले फोटो फ्रेम करायला दिलेत ते घेऊन येतो.

रूपा:—म्हणजे ? नाहीं राहवलं तुम्हाला ? राहिले असते कपाटांत पडून तर बिघडलं असतं ? आतां आणखी खडे फोडतील लोक आपल्या नांवानं—हज्जार माणसांनीं पाहिले असतील मेले ते फोटो.

जवाहर:—घाबरू नकोस. मुंबईतील एका पारशी फ्रेम मेकरकडे टाकले आहेत ते मी. ( दरवाजाची घंटी वाजते )

रूपा: —कोण ? ( दरवाजा उघडते-ओपल प्रवेश करतो )

जवाहर:—( तिरसटून ) जिथं तिथं हा आडवा पडतोय् माझ्या कामांत. ( जातो )

ओपल:—( आश्चर्यानें ) काय म्हणताहेत साहेब !

रूपा:—त्यांच्या काय नादाला लागता तुम्ही ? ( जवळ जाऊन हळूच ) पोचलें माझें पत्र—रत्नानें नीट दिलें ना ?

ओपल:—होय, हें पहा (पत्र काढतो) शेठसाहेब ठीक आहेत ना ?

रूपा:—ठीक आहेत ते...द्या तें पत्र इकडे. ( पत्र घेऊन फाडून टाकते. ते कपटे आपल्या ब्लाऊझच्या खिशांत कोंबते )

ओपल:—कुठं आहेत नीलाताई ?

रूपा:—बसल्यात् आंत दुर्दैवाचा विचार करीत. त्यांनींच तर तुम्हाला कळवायला सांगितलं मला. तिचा तुमच्यावर भारीच विश्वास आहे.

ओपल:-कां नाहीं असणार ? ती जन्मल्यापासून विटांचा कारखाना भरभराटीस आला. शेठची तरी कोण मर्जी तिच्यावर ? लक्ष्मी जणू—ती

त्यांच्याबरोबर कारखान्यांत यायची–त्यावेळीं मातींत काय उड्या मारायची ! नाचायची काय ? ज्याचें नांव तें ! (डोळ्यांत पाणी येतें) या हातांनीं खेळवलंय तिला मी...कडेखांद्यावर घेऊन फिरलों आहे. माझी ज्यूली तशी निली प्यार आहे मला.

रूपा:—त्या तें विसरल्या नाहींत. तुम्हीच तिला आधार द्यायला हवा–काय केलात विचार ?

ओपल:—करतोय मी...पण तितकासा चांगला नाहीं.

रूपा:—कोणता, तें तर सांगा.

ओपल:—आमच्या मिशन हॉस्पिटल्मध्यें जमेल तिचें. फक्त थोडीशीं डोनेशन द्यावी लागेल.

रूपा:—( एकदम ) ती मी देईन. त्याची नको फिकीर ! पण पहा बरं ! तेथील नर्सेसना–डॉक्टरना बजाऊन ठेवायला हवं ! अगदीं गुप्त राहिलें पाहिजे हें.

ओपल:— तें माझ्याकडे लागलें. केव्हां पाठवितां त्यांना ?

रूपा:— तुम्ही पूर्व तयारी करून ठेवा. एकदम घाईनें नाहीं जमायचं कांहीं. मामंजी पुलाच्या कामासाठीं बाहेर गांवीं गेले म्हणजे–बाकीचें सर्व कांहीं जुळविण्याची जबाबदारी माझ्यावर लागली . . . नि हें पहा . . . तुमचें जुळलें नाहीं, तर मी पण कांहीं तजवीज झाली तर पाहते.

ओपल:— कांहीं हरकत नाहीं. जें सोईचें पडेल तें करूं ! तोंपर्यंत ताईवर चांगलें लक्ष ठेवायला हवें.

रूपा:— मी डोळ्यांत तेल घालून वागणार आहे. नि रत्नाला पण त्यांच्यावर लक्ष ठेवायला बजाविलें आहे मी.

ओपल:— गडीमाणसावर इतका विश्वास टाकण धोक्याचें आहे.

रूपा:— नाहीं तरी मी एकटी काय करूं ? माझे ऐकेल असा रत्नाच एकटा घरांत आहे.

ओपल:—(विचार करीत) तुमचा विश्वास आहे म्हणता त्याच्यावर ?

रूपा:— ठेवायला हवा. तसा हुषार आहे तो.

**ओपल:**—जवाहरना अक्षर कळून देतां कामा नये.

**रूपा:**— त्यांना कांहींएक कळलें नाहीं नि कळवायचें पण नाहीं.

**रत्ना:**— ( प्रवेशून बाहेर दाराशीं जवाहर उभे आहेत अशी खूण करून पुढें होऊन दरवाजा उघडतो. जवाहर पुढें येतो. )

**जवाहर:**—अशीं कारस्थानें चालविलीं आहेत काय बाईसाहेब ? म्हणून तुम्हाला मोकळीक हवी होती वाटतं ? ( रत्ना बाजूला उभा राहतो )

**रूपा:**—( घाबरून ) असे ओरडतां काय ? जरा हळू बोला. थांबाना. . . माझें ऐका थोडें. घाई करूं नका. ( तो आंत जातो ) मी आलें–आलें थांबा. ( त्याच्या मागोमाग ती पण जाते. )

**ओपल:**—मोठा घोटाळा झाला. ( निश्वास सोडतो. )

**रत्ना:**—( पुढें येऊन ) कसला हो घोटाळा ? रोजचंच असतं असं त्या नवराबायकोचें. वहिनीसाहेब त्यांच्या पायां पडल्या, कीं धाकट्या शेठचा राग जाईल कुठच्या कुठं.

**ओपल:**—असें होय ? मला नव्हतं माहित हें.

**रत्ना:**—पण असं घाबरल्यासारखं काय करतां शेठ ?

**ओपल:**—( सावरून ) तुला काय माहित धाकटे शेठ दरवाजा-मागें उभे होते तें ?

**रत्ना:**—मी बाहेरच्या बागेंतून सहज नजर टाकली तों कधीं नाहीं ते गुपचूपपणानें धाकटे शेठ दरवाजाला कान लावून उभे राहिलेले मी पाह्यलें म्हणून धांवत आलों मागच्या दरवाजानें...कारण मला ठाऊक आहे धाकटे शेठ ' सुतावले तर सुतासारखे सरळ असतात—नाहीं तर—

**ओपल:**—थोरले शेठ आंत काय करताहेत ?

**रत्ना:**—पडून राहिले आहेत. बाईच त्यांचा डोळा लागला असावा. कां ? काय काम आहे वाटतें ?

**ओपल:**—काय देतात तुला पगार ?

**रत्ना:**—देतात पोटा पुरता.

**ओपल:**—कुठला राहणारा तूं ?

**रत्ना:**—रत्नागिरी जिल्ह्यांत मामांचे मालवण आहे ना ?

ओपलः—कुठला हा मामा ?

रत्नाः—अहो तो मुंबईचा . . . . . तुम्हाला माहीत नाहीं ? नवल आहे मोठं !

ओपलः—मला काय करायचंय त्या तुझ्या मामाशीं ?

रत्नाः—फार म्हणजे फार मोठा माणूस आहे तो . . . पण असा फटकळ . . . असा चावट, तुम्ही त्यांच्या गप्पा ऐकाल तर . . . !

ओपलः—ऐकेन केव्हांतरी...त्यांच्या मालवणाचा कां तूं ?

रत्नाः—नाहीं. जवळ देवबाग म्हणून गांव आहेना. त्या गांवच्या पाटलाचा मुलगा मी.

ओपलः—पाटलाचा मुलगा ? आणि नोकरी करतोस इथं ?

रत्नाः—काय करावं ? बापाशीं माझं भांडण झालं...नाहीं बरें त्याचें माझें. एक दिवशीं आलों पळून...लागली इथं नोकरी...काय वाईट आहे इथं एकट्या जिवाला ?

ओपलः—बापानें परत नाहीं बोलावलें तुला ?

रत्नाः—जातो कुठं तो—पुष्कळ पत्रें पाठवितो तो...जाईन म्हणतोय केव्हांतरी. जमलें तर दोनचार दिवसांत पण जाईन !

ओपलः—बरं वाटतं तुला इथं असलीं कामें करून ?

रत्नाः—कसें वाटेल ? जाणार आहे घरीं केव्हांतरी सांगितलेना ? ( थांबून ) तसं म्हटलं तर, शेटची कुळी, अन् आम्हां पाटलांची कुळी याच्यांत कांहीं पण फरक नाहीं. उलट आमचीच कुळी वरचढ आहे. पण. . .पण शेठ आहेत श्रीमंत–फावड्यानें पैसे ओढलेत अन् आम्ही पाटील, कष्टानें पोटापुरते पैसे मिळवतो...म्हणून आम्ही गरीब...पैका असता तर मी पण शिकलों असतों. . .हे इथं कुणाच्याहि ध्यानांत पण येत नाहीं—

ओपलः—काय केलें असतेंस तूं शिकून ?

रत्नाः—काय केलें असते ? ( ऐटीनें ) निदान रत्न्याचा रत्नाकर झालो असतो आणि बरोबर एक मड्डम घेऊन हिंडलों असतो.

ओपलः—( निरखून बघत ) सिनेमा बिनेमा पाहतोस कीं नाहीं ? आवड दिसतेय तुला. खरं ना ?

रत्ना:—बघतो ना. नाहीं कशाला म्हणूं हो? नाहींतर रात्रीचा वेळ कसा जायचा?

ओपल:—(हेरून) नीलाताई पण जात असेल सिनेमाला नेहमीं नेहमीं?

रत्ना:—नाहीं. घरांतून बाहेर पडण्याचा हुकूम नाहीं त्यांना. (मिष्किलपणें) पण सिनेमा बघायला त्यांना घराबाहेर जायला नको.

ओपल:—म्हणजे?

रत्ना:—या नवराबायकोची रुसणीं, फुगणीं, खेळणीं... (चटकन् थांबतो) जातो मी. राम राम शेट!

ओपल:—पण नीलाताईला काय उद्योग नाहीं दुसरा? त्या कशाला बघतील असले प्रकार? चार माणसांत वागणारी आहे ती शहाणी मुलगी.

रत्ना:—(थांबून) पण डोळे मिटून घ्यायच्या आंत नको तें नजरेस पडलं तर काय करणार माणूस?

ओपल:—जाऊं दे तें.. मोठ्यांच्या भानगडी आपणांस काय होत? पण रत्ना.. फार धूळ सांचलेली दिसतें या फर्निचरवर—या पुतळ्यांवर—अशीच करतोस कारे काम? बाकी तूं पाटलाचा मुलगा आहेस्!

रत्ना:—नाहीं हो. इथं मी रत्नाच आहे (सर्वांत आधीं एक नग्न पुतळा पुसूं लागतो.) नाहीं कां? पण खरं सांगूं? बेश वाटत नाहीं गेले दोनचार दिवस मला. कांहीं काम सुचत नाहीं!

ओपल:—(त्याच्या हालचालीकडे बघत) कायरे, माणिक कुठें गेला निघून?

रत्ना:—ते कां कुणास सांगून पळाले, होय?

ओपल:—नाहीं तरी, आश्रितांना वागतांच येत नाहीं एकाद्या चांगल्या ठिकाणीं...

रत्ना:—हां.. तें नाहीं मी बोलूं द्यायचा. माणिक जेवण्यापुरते घरांत यायचे! नाहींतर खालीं दरवाजाजवळच्या खोलींत वाचत बसायचे. आपलें कालेज बरें-नि आपलीं पुस्तकें बरीं! कोणाच्या आध्यांत ना

मध्यांत ! हा. नाहीं कसे ? कधीं त्या कर्णिकांच्या पाचूताई आल्या म्हणजे मात्र गुळुगुळू बोलत बसायचे त्यांच्याशीं !... साहेब ! आम्ही कोंकणी लोक गरिब असलों, तरी माघोरी कोणाला उगीच नाहीं आम्ही निंदायचं ! आमची रीत नव्हे ती.

रूपा:—( प्रवेश करून ) रत्ना ! काय करतोस तिथं. जा. मामाजी उठायची वेळ होऊन गेली... ते उठले नसल्यास उठव त्यांना. ( रत्ना चपापतो–न् जातो )

ओ. साहेब:—( उतावीळपणें ) काय झालं ?

रूपा:—( सुटकेचा श्वास सोडीत ) केली बाई तिकडची एकदांची समजूत. सगळा मानापमान गिळून नाक घासलें त्यांच्यापुढें. पायां पडलें त्यांच्या. सांगितलें, " एका असहाय स्त्रीची–तुमच्या बहिणीची अब्रू वांचवा. नका तिच्या आयुष्याचं मातेरं करूं " ( थांबते. )

ओपल:—( आपली पाईप भरीत ) त्यांनीं आपलें बोलणें आडून ऐकायला नको होतें.

रूपा:—सगळं खरं ! असा राग आलाय मला त्यांच्या या नादान-पणाचा, हलकटपणाचा–कीं... काय करणार मी त्यांची धर्मपत्नी ? लग्न करून बसलेंय ना मी ? मला कल्पनाहि नव्हती कधीं जन्मांत ते अशा अधोगतीला जातील . . . पण ही वेळ नव्हे ! पडतें घ्यायला हवें, त्यांना सांभाळायला हवें . . . बिचाऱ्या वन्ससाठीं अगदीं जाणूनबुजून प्रयत्न करायला हवा आपल्याला !

ओपल:—तरीहि कांहीं उपयोग होईल असें मला तरी वाटत नाहीं. आपल्या एकुलत्याएक चिरंजीवावर चांगले संस्कार व्हावेत, म्हणून शेठनीं भगीरथ प्रयत्न केले. पण त्याचा कांहीं परिणाम झालेला दिसत नाहीं. त्यांच्या जन्माचा आडमुठेपणा गेला नाहीं.

रूपा:—सगळं मला कळतंय ! लग्न झाल्यापासून मी येथें नांदते आहे. . . ( विचार करीत ) माझी दिशाभूल झाली. शिक्षणाकडे नि पैशां-कडे पाहून मी माझ्या वडिलांना होकार दिला. . . पहिले सहासात महिने कसे अगदीं आनंदांत गेले. दुसरा कसलाहि विचार सुचला नाहीं मला

आमच्या सुखापलीकडे ! अगदीं एकजीव झालों होतों—जगाला पार विसरून वागत होतों आम्ही. इतकी मी स्वार्थी बनलें होतें...पण आज... आज बऱ्याचशा गोष्टी मनांत नसल्या तरी बुद्धिपुरःसर कराव्या लागत आहेत.

**ओपल:**--वाईट वाटलें मला हें ऐकून. ( उसासा टाकतो ) दया येतेय मला तुमची.

**रूपा:**—दयेची खरी जरूरी आहे आज वन्संना. येईल त्या संकटाला तोंड दिलें पाहिजे आपण !

**मोती:**—( आंतूनच ओरडतो ' कुणीच नाहीं कसें घरांत ? सूनबाई कुठाय् ? निली कोठें आहे ?' असे बोलून–नंतर प्रवेश करतात ) गेला वाटतं जवाहर भटक्या मारायला ?

**रूपा:**—( आदबीनें ) नाहीं ! आंत ते वाचीत बसले आहेत.

**मोती:**—आश्चर्य आहे ! जवाहर वाचीत बसलाय ? ( साहेबाला ) नि साहेबा ! रविवार ना आज ? चर्चकडे जायचें टाकून इकडे कोणीकडे ?

**रूपा:**—बरं वाटतंय् आतां ? ओव्हलटीन आणूं कां गरम गरम ?

**मोती:**—( खुषीनें ) आणीनास ! ( रूपा जाते )

**ओपल:**—( सावरीत ) पोखराज शेठ भेटून गेले मला आज सकाळीं.

**मोती:**—कुठें ? ( अभिमानानें ) तुझ्या घरीं आला होता ना तो ?

**ओपल:**—होय.

**मोती:**—एवढा मोठा माणूस तुला तुझ्या घरीं येऊन भेटतो म्हणजे माझा विजय आहे तो–गौरव आहे तो माझा ! ( थांबून ) बरं ! काय म्हणत होता तो ?

**ओपल:**—म्हणाले–ठाणे, खानदेश, पुणें वगैरे इतर जिल्ह्यांत तुम्ही नेहमींप्रमाणें कंत्राटें घ्या ! आपण त्यांत चढाओढ करणार नाहीं . . पण कुलाबा, रत्नागिरी, सातारा, कारवार हे आमच्या वळणाचे जिल्हे ! गेलीं २५–३० वर्षें त्या त्या जिल्ह्यांतील कंत्राटें घेऊन पार पाडलीं तीं आम्ही ! तसें पुढें करूं द्या आम्हाला . . .

**मोती:**—( गर्वानें ) रे, वा रे वा ! आणखी काय काय बोलला तो ?

**ओपल:**—जास्त कांहीं नाहीं–मी उत्तर दिलें. आम्ही टेंडर भरलें तें पास झालें आहे. आतां आमच्या इभ्रतीचा प्रश्न आहे मोतीराम कोंदणे कंपनीला घेतलेलें कंत्राट पुरें करतां येत नाहीं अशी उगीच बदनामी होऊं नये आमची, म्हणून, तोटा झाला तरी आमच्या नांवासाठीं आम्हांला तें पुलाचें कंत्राट पुरें केलेंच पाहिजे !

**मोती:** –ठीक ! पुढें काय उत्तर दिलेन् त्यानं ?

**ओपल:** – म्हणाले गुड्‌वुईल म्हणून पंधराटक्के रोख देतो वाटल्यास–

**मोती:**—त्यांना सांग ! अशा पंधरा नि वीस शेंकडेवारीवर मोतीराम कोंदणे कंपनीचीं कामें नाहीं चालत म्हणावें. मोटा आलाय् पोखराज कंपनीवाला गुजराथी बनिया ! आम्हाला बनवायला तुझा बाप उतरला पाहिजे म्हणावें ! ( रूपा पेय आणते )

**ओपल:**—त्यांना काय उत्तर द्यायचें ? ( रूपा दोघांना पेय देते )

**मोती:**—( रुबाबानें बसत पेयाचा घोट घेत ) त्याला सांग–वाटेल त्यानें वाटेल त्या जिल्ह्यांत धंदा करावा. अमकी एकादी एरीया तुमच्या-साठीं अशी कोणी वाटून दिली नाहीं तुम्हांला. भलतीच मिरासदारी नाहीं चालायची म्हणावं. तुम्हाला ताकद असेल तर धंद्याच्या आखाड्यांत उतरा. दोन हात खेळा या मोतीराम शेटशीं. नाहींतर गाशा गुंडाळा–नि धंदा आटपून गुजराथेंत जाऊन बसा म्हणावें.

**ओपल:** –( पेयाचा घोंट घेत ) पुन्हां भेटले पोखराज शेठ म्हणजे सांगेन त्याना तसें.

**मोती:** —नाहीं. नाहीं. तसें नाहीं. आतांच जा आपल्या मोटारींत बसून—त्यांच्या बंगल्यावर अगदीं ऐटींत बसून जा . . . नि कळवा त्यांना माझा निरोप ! बेट्याला भारीच घमेंड चढली होती आपल्या पैशांची ! सोन्याचा धूर चढला होता त्यांच्या डोळ्यांवर ! खाडकन् उघडतील त्याचे डोळे आता !

**रूपा:**—भारीच बाई मोठ्यानें बोलतां तुम्ही मामंजी ! हळू बोलायचं जरा ! म्हणजे बरें वाटेल उद्यांपर्यंत तुम्हाला. . .( ग्लास घेऊन ) पडतां कां पुन्हा बिछान्यावर जाऊन ?

मोती:—( कौतुकानें हंसत—साहेबाला ) बरं का साहेबा ! आमची ही सूनबाई घरांत आल्यापासून घर म्हणजे मायेचे आगर वाटतंय् अगदीं. आजच पहाना ! कालच्या प्रवासानें सर्दी झाली मला. रात्रीं झोंप आली नाहीं मला . . . तो हिचा कोण आग्रह ! म्हणाली आज रविवार आहे. दिवसभर विश्रांति घ्या-—लंघन करा म्हणजे बरें वाटेल. करतां काय ? ऐकावें लागले हिचें. नाहींतर कधीं नाहीं ते बिछान्यावर पडून राह्यचें कारण कां होतें मला ? म्हटलें, माझ्या बऱ्यासाठीं धडपडते आहे. थोडक्यासाठीं कां दुखवा हिचें मन ? खरं ना ग ? ( रूपा हसते ) बरं बरं. पडतो मी जाऊन जरा आंत थोडा वेळ ! ( जाऊ लागतो )

ओपल:—एक विचारायचें राहिलें ?

मोती:—( उभ्या उभ्या ) काय ?

ओपल:—धाकटे शेठ एकरकमी अलौन्स मागतात. मला वाटतं द्यावा. काय हरकत आहे ?

मोती:—हरकत कसली आलीय् ? हातांत पैसे पडले म्हणजे ते कसे उधळून मोकळें व्हायचें हे जवाहरला शिकवायला नको. त्याच्याबरोबर हिला हिंडण्याफिरण्यांत सुख व्हावें—आनंद वाटावा—म्हणून आठवड्या आठवड्यानें चेक फाडीत चला असे मी म्हटलें होतें. हिची कांहीं हरकत नसल्यास फाडा एकदम चेक ! ( रूपा हसते )

ओपल: ( हळूंच ) थोडा वाढवावा कां अलौन्स ? म्हणजे कमी पडतो म्हणून माझ्याशीं ते हुज्जत घालीत बसायचे नाहींत.

मोती:—( रूपाकडे बघतो–रूपा संमतिदर्शक हंसते. ) पुरत नाहीं वाटतें भत्ता मिळतो तेवढा ? अँ ? वाढवा आणखी पन्नासांनीं ! गृहलक्ष्मी आनंदांत असल्याशिवाय कां कुठें लक्ष्मीचें पाऊल घरांत टिकत असते ? खरेंना ? आणि हिच्या इच्छेप्रमाणें आतां वागायला हवं. ( जाऊं लागतो—थबकतो ) पण हें पहा सूनबाई ! जवाहरकडे लक्ष ठेवलें पाहिजेस तूं ! त्यानें उच्च दर्जाच्या लोकांत सुसंस्कृत समाजांत वागावें—फिरावें. निदान कुठलेंहि व्यसन लावून घेऊं नये म्हणून दक्षता ठेविली पाहिजे. ( रूपा मानेनें होकार देते—जाते. )

ओपल:—सांगा शेठना आतां. खूष राहा म्हणावें. दर महिन्याला एकरकमी चेक देत जाईन मी. वाटल्यास आगाऊहि देत जाईन कांहीं पैसे!

रूपा:—कुठल्याहि गोष्टीनें समाधान व्हायची त्यांना संवयच नाहीं. अगदीं एखाद्या मुलासारखे वागतात ते अजून! कसें ते गप्प रहातील तें न कळे! ( उसासा सोडीत ) आपणच चुकलों. दरवाजा लावून बोलायला हवें होतें. मझ्या भावनेच्या भरामुळें लक्षांत आलें नाहीं माझ्या तें.

ओपल:—मागे उभें राहून कोणाचें बोलणं चोरून ऐकणं हे महत्पाप समजतात आमच्या धर्मांत.

रूपा:—आमच्यांतही सहसा आडून ऐकत नाहीं कुणी कुणाचे!

ओपल:—हं! ( उसासा सोडून ) काय होईल तें खरं!

रूपा:—सुचतच नाहीं मला मुळीं कांहीं. ( बसून—वेळानें ) असा हट्टी एककल्ली स्वभाव आहे त्यांचा कीं... वाटतं... आतांच ते मामंजीना आंत सांगत बसले असतील—नेम नाहीं सांगता यायचा त्यांचा! पाहून येतें ( जाऊं लागते )

ओपल:—पण तुम्हाला वचन दिलंय ना त्यांनीं?

रूपा:—न पाळण्यासाठीं अशीं शंभर वचनें दिवसांतून देत असतात मला ते. मी कां त्यांची बायको आहे? नुसतं शोभेचं जिवंत खेळणं आहे त्यांच्या हातांतलें मी.

ओपल:—आपणांकडून जरासुद्धां कसूर होतां नये.

रूपा:—माझ्याकडून नाहीं व्हायची कसूर! बाकी आतां त्या ईश्वरावर सोंपविलें पाहिजे. ( शांतता पाळा म्हणून ती रेडिओ चालू करते. घड्याळांत सहा वाजलेले असतात—ओपल पाईप पेटवितो. )

रेडिओ:—यह बंबई है! मिडियम् वेव्हवर अब मऱ्हाटीमे बच्चोंका प्रोग्राम सुनिए...

जवाहर:—( प्रवेश करतो ) काय चाललंय्?

रूपा:—( रेडिओ बंद करते ) ऐकलं कां? ऐकलं कां? आपल्याला नवीन पुलाचें कॉंट्रॅक्ट मिळालें म्हणून मामंजी खूप झाले आहेत. त्यांनीं आपला अलौन्स पन्नास रुपयांनीं वाढवला आहे.. अन् ते एकरकमी चेक देणार आहेत!!

जवाहर: —( तिच्या बोलण्याकडे पूर्ण दुर्लक्ष असते ) अस्सें होय ! अशीं कारस्थानें चाललीं आहेत वाटतं ? ( उग्रतेनें हसतो ) म्हणे बाबा खूष झाले आहेत आमच्यावर ! वा रे वा ! ( थांबतो ) आपल्या लाडक्या मुलीचें पाऊल वांकडे पडलें म्हणून त्यांना अत्यानंद झाला असेल—म्हणावें आणखी पन्नासांनीं वाढवा अलौन्स माझा ! !

रूपा: —शूत् शूत् शूत्. हळू बोला म्हणतेना ! ताळतंत्र सोडलाय तुम्ही अगदीं ! माझ्याशीं काय कबूल केलें होतें मघाशीं—आठवण आहेना?

जवाहर: —( बेपर्वाईनें ) आपल्या मागची बायकांची ब्याद चुकविण्यासाठीं पुरुष काय वाटेल ते बोलतात. . . तीं वचनं धरायचीं नसतात—समजलं बाईसाहेब !

रूपा:—( घाबरून ) काय करायचं मनांत आणलंय तुम्ही ?

जवाहर:—म्हणे ! नीलीसारखी गोड मुलगी नाहीं. ती मोठी सालस—प्रेमळ नि हुशार आहे. तिच्याशीं माझी तुलना करतात बाबा नेहमीं ! मी म्हणजे कोणत्या झाडाचा पाला वाटत असतो त्यांना ! म्हणावें आतां नीट डोळे उघडून पहा जरा !

रूपा:—( घाबरून ) म्हणजे तुम्ही त्यांना सांगितलें सारें ?

जवाहर:—( छाती काढीत ) होय ! तोंडानें सांगतां आलें नाहीं तरी—पत्र लिहून ठेवलंय त्यांच्या टेबलावर आंत !

रूपा:—( उसळून ) आपल्या पाठीला पाठ लावून आलेल्या बहिणीची अब्रू वेशीं टांगतांना कांहीं शरम वाटायला हवी ! तिच्या आयुष्याच्या नाशाबरोबर—आपल्या कुटुंबाच्या इभ्रतीचाहि नाश...

जवाहर:—आमच्या कुटुंबाचे हिताहित कशांत आहे हें मला चांगले कळतंय. कुटुंबाच्या कर्त्या माणसाच्या कानीं घरांतील भानगडी जायलाच हव्यात. त्याच्यापासून गुप्तता राखण्यांतच कुटुंबाचा नाश व्हायचा संभव असतो. निदान मी त्यांचा मुलगा म्हणून माझें कर्तव्य बजावलें आहे ! बायकोच्या नादाला लागून आपल्या मुलानें आपल्याला फसविलें असें निदान बाबांना तरी बोलतां यायचें नाहीं.

रूपा:—( रागानें ) अस्सें ! आज तुम्हाला या घातकी वेळीं कर्तव्या-

कर्तव्याचा विचार सुचला ! नाहीं ? अजूनपर्यंत सर्व कांहीं मामंजीच्या कानीं घालून वागत होतां, नाहीं ?

जवाहर:—तो तुझा प्रश्न नाहीं !

ओपल:—खरें केव्हां बोलायचें याचा माणसानें सारासार विचार केला पाहिजे.

जवाहर:—( चिडून ) साहेबा ! तुझें ते येसूचें तत्त्वज्ञान घरींच ठेवून येत जा इथं. थकलों मी तुझ्या त्या आकाशांतील बापाचे उपदेश ऐकून ऐकून !

मोतीराम:—( आंतूनच आरडत ओरडत येत ) कुठाय निली ! कुठाय् कारटी...कुठं गेली ती चांडाळीण अवदसा ! ( प्रवेश ) कुठाय् ती ?

रूपा:—( गुडघे टेकून त्यांच्या पायाला हात लावीत ) असें उतावीळ होऊं नये. पायां पडते मी तुमच्या ! असें अचानकपणें रागाच्या भरीं पडून वाटेल तसं वागूं नका . पायां पडतें मी ..

मोतीराम:—( ताठ्यानें ) सूनबाई बाजूला हो तूं ! यांत पडायचं कारण नाहीं तुला. भलत्याच गोष्टींत आग्रह धरलास, तर तुझा अपमान होईल.

रूपा:—( घाई घाईत—पण भावनावशतेनें ) माझा करा अपमान हवा तेवढा...पण एका गरीब अबलेची—आपल्या भाबड्या—लाडक्या मुलीची अब्रू अशी चव्हाट्यावर मांडून तिच्या आयुष्याचा बाजार करूं नका...मला लाथेनें तुडवा वाटेल तर . . . पण मी आपले पाय . . .

मोती:—दूर हो रूपा . . . होते कीं नाहीं ?

रूपा:—कसं सांगूं मी आपणाला म्हणजे आपलें मन द्रवेल . . . मामंजी . . . नीला आपली लाडकी मुलगी ना ? तिच्यावर जीवापलीकडची माया आहे ना तुमची . . . जरा सबूर करा ! तासा दोन तासांनीं आपण वन्संना घेऊन सावकाशपण बोलू शकतो . . . पण आतां या उसळणाऱ्या रागांत कांहीं व्हायला नको . . ( पाहते ) किती भयंकर रागांत आहां तुम्ही.. थरथरतंय् शरीर तुमचे ! मामंजी...मन सांवरा—शांत व्हा जरा ... शहाण्या लोकांनीं म्हटलं आहे, दहा अंक मोजावेत अशा वेळीं . . .

**मोतीराम**:—रूपादेवी ! आपली पायरी सोडून बोलत आहां तुम्ही ! मला शहाणपणाच्या गोष्टी शिकवायला सून म्हणून नाहीं आणली घरांत तुम्हांला !

**ओपल**:—शेठसाहेब ( जास्त पुढें होऊन ) शेठसाहेब ! शांत व्हा शांत व्हा ! ! आपण शांतपणानें बोलूं शकतों सर्व कांहीं वाटल्यास यावेळीं !

**जवाहर**:—रे सायबा ! तुझा हा शांतपणा कारखान्यांतील नोकर चाकरासाठीं राखून ठेव, त्यांना सांभाळीत जा !

**मोतीराम**:—( हातांतील पत्र दाखवीत ) जवाहरनें हें लिहलंय तें खरं आहे रूपादेवी ?

**रूपा**:—( खाली मान घालून ) दुर्दैव बिचारीचें ! !

**मोतीराम**:—( पाय आपटीत-उसळून ) नीले नीले... कुठाय ती बाजारबसवी. बोलाव तिला माझ्यासमोर ! जवऱ्या ! जा म्हणतो ना ! ( जवाहर आंतील बाजूस जातो )

**रूपा**:—( पुन्हा एकदां हात जोडीत ) भीक मागते मी वन्संसाठीं. ( पदर पसरते ) एवढी भिक्षा घाला मला मांमजी !

**मोतीराम**:—रूपादेवी-रूपादेवी... असल्या गोष्टी मला खपत नाहींत !

**रूपा**:—रागाऊं नये एवढे...माझं ऐका, याचा परिणाम चांगला व्हायचा नाहीं यावेळीं...

**मोतीराम**:—काय परिणाम व्हायचा असेल तो होऊं दे ! माझं मी पाह्यला समर्थ आहे... माझ्या मनगटावर अजून केंस आहेत !

**रूपा**:—पुन्हा बजावते. परिणाम ठीक नाहीं होणार !

**मोतीराम**:—( उसळून ) कोणापुढें या गोष्टी बोलतां आहां तुम्हीं ? कालची पोरटी मला म्हाताऱ्याला शहाणपणा शिकवायला आलीय ! बी. ए. झाल्यात म्हणून अक्कल वाढलीय असें समजूं नका तुम्ही !

**जवाहर**:—( प्रवेश करून ) ती येत नाहीं.

**मोतीराम**:—( दांत ओठ चावीत ) येत नाहीं ? कशी येत नाहीं ? मीच जातो नि फरफरां ओढीत आणतो मी – नि ढुंगणावर लाथा देऊन

लावतो घालवून या माझ्या घरांतून तिला. ( जाऊं लागतो. )

रूपाः— ( मधेंच ) थांबा. इतक्या थराला जायची जरूरी नाहीं. मी येते घेऊन वन्संना! ( जवाहर मोतीरामकडे पहातो ) ( जातांना ) तुम्हाला दुर्बुद्धि सुचली नसती तरच नवल होतं. ( जाते. )

जवाहरः—( तिच्या मागें जात ) काय बोललीस ?

मोतीरामः—गप्प बैसरे तूं!

जवाहरः— राहिलें आमचं! तुम्ही म्हणत होतांना ? निलीला शिकवायचं—तिला मोठी करायची! चांगला श्रीमंत नि शिकलेला नवरा करून द्यायचा—नि आतां ... तिनेंच आपल्या तोंडाला काळं फासायची वेळ आणली आहे आज! त्यापेक्षां आम्ही बरे!

मोतीरामः—चूप बैस! तुझी वटवट ऐकायची इच्छा नाहीं मला. कालचं पोर—अक्कल नाहीं काडीची. नि मिजास करतोय बृहस्पतीची!!

जवाहरः—राहिलें आमचें!

मोतीरामः—( पाय आपटीत येरझारा ) घालतो—ओपल त्यांच्याकडे बघत आहे...जवाहर तेथील पुतळयाजवळ जाऊन त्याकडे बघत राहतो. )

रूपाः—( प्रवेश करते ) याना वन्सं...या. मी आहे. भिऊं नका... ( ती येत नाहीं म्हणून पुन्हा आंत जाऊन नीलाला धरून हलके हलके तिला बाहेर आणते—नीला रडत असते. )

नीलाः—( हात मोकळा होताच दोन्ही हातांनीं आपलें तोंड झांकून घेते. )

मोतीरामः—काय ए ग कारटे. काय ऐकतो मी हें ? खरं कां हें—उत्तर दे—बोल.

नीलाः—( ढसढसां रडते. )

मोतीरामः—मी विचारतो त्या प्रश्नांची उत्तरें दे नाहींतर थोबाड वाजवीन.

नीलाः—( एकदम त्यांच्या पायांना बिलगते—तो बाजूला होऊं पाहतो. )

**रूपाः**––आणखी काय उत्तर देणार त्या ? कां लाजवितां त्यांना ?

**जवाहरः**—( पुढें येऊन ) करणी करतांना नाहीं लाज वाटली ? नि आतां मोठी…

**मोतीरामः**—चूप रे . . ( नीलाला उठवून तिचे दोन्ही दंड धरून तिला गदगदा हालवित ) नीले— करंटे ! खरं कां हें ?

**नीलाः**—( डोळ्यांतून अश्रू वाहतात . . . बापाकडे पाहण्याचा प्रयत्न करून पाहते-पण शेवटीं मान खालीं घालते ) क्षमा करा बाबा–मला…मला वांचवा—( पायां पडते. )

**मोतीरामः**—का…का…काय म्हणालीस तूं ? ( तो तिला पायांनींच दूर लोटतो. )

**नीलाः**—( दाबलेली किंचाळी फोडून ) अयाई ग ऽऽ!! आई ऽऽ!!

**रूपाः**— } ( जवळ जाऊन तिला सांभाळतात—उठविण्याचा
**ओपलः**— } प्रयत्न करतात ) वन्सं ताई !

**मोतीरामः**—आतां कशाला त्या साध्वीची आठवण काढतेस ? तिच्या नखाची तरी तुला सर येईल कां ? हलकट–डॅम्बीस–कारटी…माझ्या या घराचा सत्यानाश केलान्—माझ्या तोंडाला डांबर फांसलेन्–मला जगांत तोंड दाखवायला जागा ठेवली नाहीं या कुळबुडवीनें—( तिला मारायला धांवतो ) ( ओपल आडवतो ) कशाला कशाला माझ्या पोटीं जन्माला आलीस ? बाजारबसवी…

**रूपाः**—( मधें येऊन ) हें काय हें भलतें–नाहीं नाहीं तें बोलतां त्यांना ? जिभेला हाड तरी ?

**जवाहरः**—बाजारबसवीसारखें वागायचें…नि तसें कोणी बोललें तर मात्र…

**रूपाः**—( उसळून ) कोण बनवितें आम्हां स्त्रियांना बाजारबसव्या ? पुरुष ना ?

**मोतीरामः**—( ओरडून ) गप्प बसा कारट्यांनो ! मला कांहींहि कुणाचें ऐकायचें नाहीं. ( नीलाकडे दांत ओंठ चावीत ) काय ग ए कुलांगार पोरटे . . . मी माझें नांव कसें कमविलें–कसा मी मोठेपणास चढलों–

नि एका क्षणांत—मी गेलीं पस्तीस वर्षे बांधीत असलेली माझ्या कीर्तीची इमारत एका क्षणांत जमीनदोस्त केलीस-पार धुळीस मिळविलीस तूं! ( थांबून ) मुंबईच्या कोणत्याही नवीन इमारतीच्या भिंतीवर थाप मार .... त्यांत रचलेल्या प्रत्येक विटेवर असलेलें माझें नांव सारखें दुमदुमून तुझी कानटळी बसवील . . . तें माझें नांव . . . माझं नांव . . पार रसातळाला मिळविलेन् या करंटीनें . . ( कपाळावर हात मारून बसतो ) कशी सहन करूं ही बदनामी . . . ( उठून ) काय करूं रे? व्यापारांत खोट येऊन माझें दिवाळें वाजते तरी मी पर्वा केली नसती. इतक्या उतार वयांतसुद्धां पैसे मिळविण्याची हिंमत बाळगून जगाशीं झगडलों असतों...नि आतां... माझ्याजवळ गडगंज पैसा असूनही वाटेंतला चोरसुद्धां माझ्याकडे बोट दाखवीत . . . ‘ याचीच ती मुलगी ’ असें म्हणून ठाण्याच्या बाजारांतील तांबोळी तांबटापासून वकील बॅरिष्टरांपर्यंत सारे लोक माझी टायली करणार... अरेरे...कसा सहन करूं हा अपमान.. ? काय केलेंस हें अवदसें! ( कपाळाला हात मारून घेऊन पुन्हा खुर्चीवर कोसळतो. )

जवाहर:—मलासुद्धां घरांतून बाहेर पडायची चोरी होणार... !

रूपा:—(मोतीराम जवळ जाऊन) पण आतां...आतां काय तें...

मोतीराम: —( उसळून ) आतां काय ?

रूपा: - (धैर्यानें) पहिली गोष्ट म्हणजे वन्संना संकटमुक्त करायला हवें.

मोतीराम: —भट्टींत घाल तुझ्या त्या वन्संना...ही महामाया... मागें बारा वर्षांची असतांना टायफॉईडनें आजारी पडली होती. छान मरत होती त्या वेळीं...पण मुंबईहून मोटमोठे डॉक्टर बोलावून केवढ्या परिश्रमानें मी हिला वाचविली...तों आज हिनें माझें चांगलेंच नाक कापलेन्.—

रूपा:—पुष्कळ झालें...आतां आपली अब्रू वांचविण्याचा एकच मार्ग आहे, गुप्ततेनें सुटका करायला हवी त्यांची...

जवाहर:—( रूपाजवळ जाऊन ) म्हटलं तसं करणें मोठा गुन्हा होतो बाईसाहेब !

रूपा:—( त्याच्याकडे खालीवर पहात ) सगळेच गुन्हे कांहीं उघडकीला येत नाहींत...

जवाहर:--पण अशी एका जित्या जिवाची हत्त्या करण्यापेक्षां, नीली जर त्या इसमाचें नांव सांगेल तर त्या माणसाशी तिचें लग्न लावून देऊं...

मोतीराम:—( एकदम उठून ) नीली...सांग कोण आहे तो ?

रूपा: —( रागांत ) असें काय बेगुमानपणानें कांहीं तरी वागताहांत तुम्ही ?

जवाहर:– आम्ही बेगुमानपणें कांहीं तरी वागतो. नि या तुझ्या लाडक्या वन्संचं वागणं मात्र ...

मोतीराम:—गप्प बैस रे ए! ( नीलाला ) हं बोल झटकन् !

रूपा:—त्याच्या मनांतून नांव सांगायचें असते तर त्यांनीं विश्वासानें नसतें कां मला सांगितलें ?

जवाहर: – विचारलें होतेंस तूं तिला तसें ?

रूपा:—नाहीं—पण त्यांनीं आपण होऊन...

मोतीराम:—म्हणूनच आम्ही विचारीत आहों...

नीला:—( ढसढसून रडते-आपलें तोंड पदरांत झांकून घेते ) वहिनी,– वहिनी...( धांवत येऊन तिच्या छातीवर डोकें ठेवीत-रूपाकडे केविलवाण्या नजरेनें बघत ) वहिनी, वांचीव मला आतां !

रूपा:—( तिला प्रेमानें कुरवाळते—बिलगते ) शांत व्हा पाहूं जरा ! बिचाऱ्या ! !

जवाहर:—( रूपाजवळून तिला खेंचून ) अशी राहा उभी येथें. ( आपण स्वत: आणि मोतीरामशेठ—अशामध्यें तिला उभी करतो ) हं सांग कोण होता तो—सांग.

मोतीराम:— सांग म्हणतोय ना मी—

रूपा: —( चवताळून...पण राग दाबीत ) वन्संची सुटका करण्यापेक्षां तुम्हा पुरुषांची, स्त्रियांच्या बाबतींतील कुत्सित जिज्ञासावृत्तिच जास्त दिसतेय् मला तुमच्या अशा वागण्यांत.

जवाहर:—( रूपाला खेंचून बळेंच तिला दूर नेऊन बसवितो. ) पुरे झाली तुझी ही पोपटपंची.

मोतीरामः—( रूपाजवळ जाऊन छाती पुढें काढून ) रूपादेवी! तुमच्या बी. ए. च्या पांडित्याचें प्रदर्शन नकोय् येथें. ( नीलाकडे येत—गुरगुरून ) हं सांग नाहींतर . . . ( तिच्या थोबाडांत मारण्यासाठीं हात उचलतो ).

जवाहरः—सांगना—सांगना !

रूपाः—मोटारींत बसण्याइतकी सोपी गोष्ट समजलां वाटतं?

मोतीरामः—( ओरडून ) रूपादेवी ! एक शब्द बोलला यापुढें तर तुमची गय केली जाणार नाहीं. . .

जवाहरः—नांही सांगत ? नाहीं सांगत ? ( तिचा उजवा हात आपल्या हातांत दाबतो. )

नीलाः—आई गऽऽऽ !

ओपलः—( गंभीरपणें पुढें होऊन ) भावनावेगानें भांबावलेल्या मनस्थितींत कुणीही कबुली देत नसतं.

मोतीरामः—माहित आहे सायबा ! (नीलाकडे बघून) सांग म्हण-तोय ना मी ?

नीलाः—(हताश होऊन) सांगते ! (जवाहर तिचा हात सोडतो... ती आपलें तोंड पुन्हा आपल्या पदरांत लपविते )

रूपाः—( ओपलकडे बघत निघून जाते )

ओपलः—( जाणाऱ्या रूपाकडे बघत निघून जातो )

जवाहरः—आतां कोणी नाहीं येथें परकें ऐकायला ! माणिक होता तो ? तो खाल्या घरचे वासे मोजणारा हलकट माणिक का ?

नीलाः— ( एकदम ) नाहीं–मुळींच नाहीं.

जवाहरः—मग तो काल एकाएकीं घरांतून नाहींसा कां झाला ?

नीलाः—मला माहीत नाहीं.

जवाहरः— मग ? तो नव्हता तर त्याचा बाप होता दुसरा कोण ?

मोतीरामः—( तिला हलवीत ) खरं तें उत्तर दे. सांगतोयना मी !

नीलाः—( चिडून–त्या दोघांकडे आळीपाळीनें बघत ) तुम्ही बाप आहां . . . कीं कसाब आहां ?

जवाहर:—( तें देत नाहीं तरी पुन्हां तिचा उजवा हात आपल्या हातांत घेऊन, तो दाबीत ) सांग नांव एकदम ..

नीला:—( कळवळून हात सोडविण्याचा यत्न करते ) सोडना . . अयाई ऽ ऽ सोड, सोडना··· अयाई ऽ ऽ ऽ

जवाहर:—तूं सांगितल्याशिवाय नाहीं.

मोतीराम:—( तिचा डावा कान पिरंगाळीत ) सांग त्याचें नांव ! कोण होता तो ?

जवाहर:—( बळ करून तिचा हात दाबतो ) सांग—

नीला:— ( अगदीं–अगदीं कळवळून ) सांगते, हात सोड पाहूं अगोदर·— !

जवाहर:—( हात सोडतो ) बोल.

नीला:—( भकासपणें समोर बघत ) तो...तो...तो पुरुष होता !

मोती:— ( उसळून पाय आपटतो ) पण त्याचें नांव काय ?

नीला:—मला माहीत नाहीं.

जवाहर:—तो पुरुष होता नि त्याचें नांव माहीत नाहीं ?

नीला:—(चिडून) खरें म्हणजे तो पुरुष नव्हता...होता . तो... निसर्ग होता.

जवाहर:—निसर्ग ? ( मोतीरामकडे बघत ) निसर्ग ?

नीला:—तुला दाढीमिशा कशा वाढतात ? तसंच कांहीं तरी ! !

मोतीराम:— ( तिच्या पाठींत एक गुद्दा लगावीत ) अशी ही कारटी वठणीवर यायची नाहीं. थांब . . . ( घाईघाईनें आंत जातो. )

जवाहर:—( पुन्हां तिचा तोच हात बळजबरीनें आपल्या हातांत घेत – जोरानें दाबतो ) कोण होता तो ?

नीला:—( कळवळत ) आई ग ऽ ऽ ऽ अयाई ऽ ऽ ऽ वैनी... वैनी . . . काका . . . काका . . . काका . . . धांवा . . . धांवा...

मोतीराम:— ( बंदूक घेऊन प्रवेश करतो—नीलावर रोखून धरतो ) सांगते कीं नाहीं ? नाहींतर गोळी घालून ठार करीन !

रूपा:—( आंतून प्रवेशून ) हें काय हें ? ( मोतीरामला आडविते ) मुलीची शिकार करताय ?

मोती:--बाजूला व्हा तुम्ही—

रूपा:—मला वाटेल तर गोळी घाला . . पण निरपराधी वन्संना. . पायां पडते.

नीला:—(जवाहरच्या हात दाबण्यामुळें ती अखेरीस मूर्च्छा येऊन जमिनीवर पडत आहे ) आई ऽ ऽ ऽ ऽ

जवाहर:—( दांत ओठ चावीत – क्रूरतेनें ) कोण होता तो ?

ओपलः—( धांवतच प्रवेश करतो ) हां हां शेठसाहेब ! ! ( त्याच्या बंदूकीचा नेम नीलाकडे आहे असें बघतांच तिच्या देहावर पडून तिला आपल्याआड करतो...तिच्याकडे बघतांच ) बेटी-बेटी...ताई ?

पडदा पडतो.

## दुसरा अंक समाप्त.

# अंक ३ रा

[स्थळ: ठाणे; वेळ तिसऱ्या दिवसाची सायंकाळीं ५॥ वाजतां, पहिल्या अंकांतील दिवाणखाना पूर्वीसारख्याच स्थितींत आहे. रेडीयो चालू असून त्यांतून कोणी तरी सखेद पण मंदस्वरांत गात आहे. दाराची घंटी वाजते ]

**रत्ना:**– ( प्रवेश करतो ) कोण आहे ?...( दार न उघडतां तेथील आरशांत पाहून केस ठाकठीक करतो, ( पुन्हा घंटी वाजते ) किती मोठ्यानें घंटी वाजवितात हे येणारे लोक कुणास ठाऊक ? ( पुन्हा आरशांत पहातो ) त्यांना वाटते आपण एकटे तेवढे जागे असून घरांतील सारीं माणसें झोपा काढीत असावींत ! (घंटी वाजते) आलो नव्हे कां ? रेडीयो बंद करून (दरवाजा उघडतो. ओपलसाहेब प्रवेश करतो ) रामराम साहेब. रामराम ! ( जणूं कांहीं काम करीत होतो असें दाखविण्यासाठीं तो तेथील फर्निचर साफ करूं लागतो. )

**ओपल:**–इथं होतास तूं ? तर दार उघडायला कां वेळ लावलास रे ? ऑं ?

**रत्ना:**—कानांत विहिरींतील पाण्याचे दडे बसलेत साहेब. नाहीं ऐकूं आली घंटी-

**ओपल:** –( त्याच्याकडे बघत. ) आज आहे तरी काय ?

**रत्ना:**—कांहीं नाहीं ! कुठं काय आहे ?

**ओपल:**—रत्ना ! सकाळीं विचारायचें विसरलों तुला. नीलाताईनें विहिरींत उडी मारल्याचें तुला रे कसें कळलें अगोदर ?

**रत्ना:**—काल संध्याकाळपासून मला त्यांचें लक्षण ठीक दिसत नव्हते ! मी वैनीसाहेबांना सांगीतलें. त्या म्हणाल्या–मी लक्ष ठेवते–तूं पण ठेव.... नीलाताई निजलेल्या बघून वहिनी गेल्या झोपायला. पण मी कुठला जायला ! मी आख्या रात्रभर जागत राहिलो. त्यांच्यावर पाळत ठेवली. पण पहाटेस मला पण डुलकी यायला लागली. तेव्हां विचार केला–झोंपायचें तर विहिरी-पाशी झोंपलेलें काय वाईट ? म्हणून मी बेंडाच्या पलीकडच्या बाजूला पडून

राहिलो. तो धापकन् आवाज झाला. मी हेरलें काय झालें तें—राहाटाच्या दोरीनें आंत उतरलों मी-ताईंना धरून टेकून ओरड केली मी. पहिल्यांदा माळी आला. वहिनी आल्या नि मग शेठ आले.

**ओपल:**—शाबास रत्ना!.. तुझे उपकार शेठनीं विसरून चालायचे नाहींत.

**रत्नाः**—( तोंड फिरवीत ) मी ताईंना वांचविलें...पण वैनीसाहेबांशिवाय कोणीच मला भलें म्हटलें नाहीं...ताई तर माझ्यावर पेटल्या आहेत...म्हणाल्या 'कशाला वाचवितोस मला? मेले असते तर काय दुनिया ओस पडली असती?' आता—सांगा तुम्ही!

**ओपल:**--ताईच्या बोलण्याकडे लक्ष देतोस तूं रत्ना? ताईनें कितीहि शिव्या दिल्या तरी राग नाहीं यायचा तुला—खरे ना?

**रत्ना:**—रागाऊ कशाला? त्यांचं डोकं ठिकाणावर नाहीं हें मला सांगायला हवंय?

**ओपल:**—खरंना? चलाख आहेस तूं! घरांत कांहीं होवो—तुम्हा कोंकणच्या हुषार लोकांच्या नजरेंतून सुटायचें नाहीं तें—!

**रत्नाः**—वा—वा—वा—! साहेब! (सांवरून) आपल्याला नाहीं बुवा माहित ताईची भानगड!

**ओपलः**—-मला माहित आहे! तूं सांगायची जरुरी नाहीं...! ( थांबून ) बरं-घरांत ताई काय करतेय् रे? तिला पाठवून दे बरं झटकन्!

**रत्नाः**—( ओपलसाहेबाकडे संशयानें-खालीवर बघत निघून जातो. )

**ओपलः**—( तेथें टांगलेलीं साधुसंताचीं वचनें मोठ्यानें वाचतो-टेबलावरचे मासिक उचलतो...तो घाईघाईनें नीला प्रवेश करते. )

**नीलाः**—( तिचा डावा हात रिंगमध्यें अडकविलेला आहे... येतांच पुरुष आंतून दिवाणखान्यांत येण्याचा दरवाजा बंद करते...बाहेरून आंत यायचा पण दरवाजा बंद करते ) आलांत काका! मला वाटलं होतं कारखान्यांतलं काम मधेंच सोडून तुम्ही येणार नाहीं. बाबांनीं विचारलें नाहीं? माझा फोन मिळाला?

**ओपलः**—बेटी! घाबरू नकोस अशी! मिळाला तुझा फोन. शेठना

न विचारतांच आलों मी इकडे निघून. तूं बोलावले होतेस ना? आतां यापुढें शेठना भिऊन वागण्याची माझी इच्छा नाहीं. म्हणून तडक आलो मी निघून...बरं...तुझा हात कसाय्?

**नीला:**—दुखतोय अजून भारी. (ओपलजवळ जाऊन) काका... बाबांनीं मला वागविलें नाहीं इतक्या प्रेमानें तुम्ही वागविली मला लहानपणापासून पण...मी माझ्या वागण्यानें तुमच्या मनाला यातना दिल्या—माझ्यावर संकटानें—नि झाल्या प्रकारांनीं तुम्हाला फार फार दु:ख झालं असेल ना! बाबांनीं तुमचा करूं नये तो अपमान केला. क्षमा करा काका मला! अगदीं तुमची ज्यूली समजून मला क्षमा करा—(ती त्याच्या पायां पडूं इच्छिते. पण तो तिला उचलून धरतो—ती त्याच्या छातीवर डोकें टेकून स्फुंदते.)

**ओपल:**—नाहीं बरं बेटी! मी तुझ्यावर कसा रागावेन? इतकें सर्व ज्यूलीनें माझ्या मनाविरुद्ध केलेन् तरी मी तिला शब्दानें रागावलों नाहीं...! माहित आहे तुला?

**नीला:**—खरंच काका किती थोर—मायाळू आहां तुम्ही..., तुम्हांला पसंत नसलेल्या फर्नांडीसवर ज्यूलीचें प्रेम जडलं...आणि तुम्ही तें मान्य करून तिचें लग्न लावून दिलें...आतां त्यांचा गरिबीचा संसार असूनही ती दोघें किती सुखी आहेत!

**ओपल:**—नि हेंच मी आज सकाळीं शेठना स्पष्टपणें—अगदीं तोंडावर सांगितलें...

**नीला:**— काय सांगितलें?

**ओपल:**—दुसरं काय सांगणार? नीला प्रेम करीत होती त्या मंगलशीं तिचें लग्न तुम्ही लावून द्यायला हवें होतें...वेळेवर तिचें लग्न होतें... तर असे...! ( थांबतो )

**नीला:**—( मान खालीं घालून ) काय उत्तर दिलं त्यांनीं?

**ओपल:**—"खरं आहे सायबा तूं म्हणतोस तें...लाख दोन लाख रुपये हुंडा देऊन मंगलला श्रीमंत करतां येणें शक्य होतं..." असं म्हणाले आणि आपल्या हपीसांत जाऊन बसले ते.

**नीला:**—आतां काय त्याचें?

**ओपल:**—तेंही जमवून आणतां आलें असते...पण एक गोष्ट तूं गैर केलीस—

**नीला:**—मला माहित आहे ती...पण मी काय करूं ? मला सर्वांनीं चरकांत धरलें होते. बाबा म्हणाले "तुझें काळें तोंड पुन्हा दाखवूं नकोस !"

**ओपल:**—तें खरें ! जीव देण्यासारखें महापातक नाहीं आमच्या धर्मांत...थोडा संयम राखला असतास...!

**नीला:**—संयम ! ( उसासा सोडते ) खरें सांगू काका ? मला अजू: नही मरावेंसें वाटतंय् जगाचा वीट आलाय अगदीं.. ( बेचैन होते ) काय करूं मी ? ही जमीन दुभंग होऊन पोटांत घेईल मला तर बरं होईल !

**ओपल:**—वेडी कुठची ! तुला जगाचा कितीहि वीट येवो आतां—यापुढें तुला जीव देतां यायचा नाहीं. त्यानें तुझ्या वडिलांपासून आम्हां सर्वांच्या माना लटकतील !

**नीला:**—तुमच्या माना लटकतील ?

**ओपल:**—ऐक—! विहिरींतून वर काढल्यानंतर कांहीं वेळपर्यंत तुला शुद्ध आली नव्हती...आम्ही सर्वजण घाबरून गेलों . . . म्हणून डॉक्टरना बोलाविले—त्यांनीं तुला तपासले . . . त्यांना सर्व प्रकार कळून चुकला . . .

**नीला:**— आई ग ! कसं सहन करूं मी हें . . . देवा ! ( सोप्या-वर कोसळते )

**ओपल:**—बेटी ! अशी वैतागूं नकोस ! पुढचा विचार करायला हवाय् ! नीट समजून घे सार ! यापुढं तूं स्वतः होऊन दिलास जीव, तरी तो तुझ्या पालकांनीं तुला द्यायला लावला आहे असें समजून तुझ्या कुटुंबी-यांवर फौजदारी चालेल. तुला कांहीं दिवस गेल्याचें पुराव्यानिशीं कोर्टापुढें आणलें जाईल. आणि अर्थात् तुझ्या पालकांवर भलताच हेतू आरोप केला जाईल. आणि तुझी हत्त्या केल्याचा गुन्हा सिद्ध होतांच त्यांना जन्मटेपीची शिक्षा देण्यांत येईल.

**नीला:**—मला नव्हतें माहीत. खरं कां असा कायदा आहे ?

**ओपल:**—होय ! आतां तुझी चूक तुला उमजली ना ?

नीला:—मी तरी दुसरें काय करू शकणार होतें? माझ्या सहन-शक्तीच्या बाहेरच्या गोष्टी घडल्या—मला कांहीं म्हटल्या कांहींच सुचलें नाहीं. माझें मठ्ठ डोकें अगदीं सुन्न झालें होतें.

ओपल:—पण तुला मदत करायचें वैनीसाहेबांनीं—कबूल केलें होतें ना? मग उगीच उतावीळपणें कां अशी वागलीस?

नीला:—बोलल्या होत्या वैनी तसें मजजवळ...पण इतकी बजबज-पुरी झाल्यावर—घरांत सर्वांना कळल्यावर—मग कांहींहि करून जगण्यांत काय अर्थ आहे असें वाटलें मला ..ती नामुष्की—ती बदनामी माझ्या-च्यानें जन्मभर सहन होणार नाहीं...म्हणून अजूनहि ... ( ओपल तिला चूप करतो ) पण मला खायला उठलेल्या या घरांतील परिस्थितींत मी कशी जगू!—( थांबून अडखळत ) तो उपाय नाहीं कां?

ओपल:—भोळी कुठची! गर्भपात करणें हा कायद्यांत गुन्हा मानला आहे मोटा...कालची परिस्थिति निराळी होती...अन् ती आमच्याशिवाय कुणाला माहीत नव्हती... म्हणून जरूर ती गुप्तता राखून कायद्यांत येणार नाहीं असा प्रयत्न करतां येणें शक्य होतें...

नीला:—किती शिक्षा सांगितलीय् ह्या गुन्ह्याला?

ओपल:—जन्मठेपीची!

नीला:—( एकदम ) भोगायला तयार आहे मी ती शिक्षा...पण या घरचा वारा नकोसा झालाय मला अगदीं!

ओपल:—जीव देणें–नि जन्मठेपीची शिक्षा भोगीत तुरुंगांत खितपत पडणें यांत पुष्कळ अंतर आहे बेटी! तुरुंगांत क्षण क्षण मोजीत वीस वर्षें खितपत पडण्यापेक्षां एकदाचें मरण बरं असें वाटेल तुला समजलं? सोडून दे तो घाणेरडा विचार नि आतां घाईनें कोणतीही गोष्ट करूं नकोस. माझ्यावर विश्वास ठेव! हेही दिवस निघून जातील... खंत करीत बस-ण्यांत अर्थ नाहीं. ( थांबून ) बाकी जें कांहीं करायचें असेल तें तूं माणूस आहेस हे समजून कर! मान ताठ ठेऊन धीटाईनें वागायला शीक! म्हणजे तुला कमी दुःख होईल. जगाला भिऊं नकोस–उलट टोकऱ्या दिल्या पाहिजेत त्याला!

**नीला**:—मला हें कसें जमेल ? मी कशी माझी नजर वर करून बघूं जगाकडे ? ( रूपा प्रवेश करते–ओपल पाठमोरा असल्यामुळें त्याला ती दिसत नाहीं. )

**ओपल**:—तूं कांहीं असा मोठा गुन्हा केला नाहींस ! फक्त मानवानें रुढावलेल्या सवलतीच्या अगोदर निसर्गाच्या आधीन झालीस, म्हणून समंजस लोक सहानुभूतीनें तुझी कींव करतील.

**रूपा**:—त्या समंजसांत पुरुष येणार नाहींत !

**ओपल**:—थोड्याशा अर्थानें खरें आहे तें. . . .मला या माझ्या नीलीबद्दल सहानुभूति वाटतेच नाहीं तरी.

**रूपा**:—तुमच्यासारखीं माणसें अपवाद म्हणून सांपडतील या जगांत ! स्त्रियांच्या अशा नाजुक स्थितींत प्रत्येक-प्रत्येक पुरुषाच्या जिव्हाग्रावर तो कोण ? हा प्रश्न कसा अगदीं सारखा थैमान घालीत असतो...ती पुरुषी जिज्ञासा अगदीं सनातन आहे !

**ओपल**:—ती ईश्वरनिर्मित आहे—मानसशास्त्राला धरून आहे.

**रूपा**:—नाहीं. मुळींच नाहीं. ती ईश्वरनिर्मित नाहीं. पुरुषांना गर्भ राहात असतां तर त्यांचें मानसशास्त्र पार उलटंपालटं झालं असतं !

**ओपल**:—( विचारांत ) कबूल करतो मी ! पण मनांत आलें तरी तसें कुणाला विचारून त्याची जास्त चिकित्सा करू नये. असा शिष्टाचार आहे. नि तो सभ्य नि सुसंस्कृत समाजांत वाढत आहे; नसला तर वाढायला हवाय् !

**रूपा**:—तुम्ही वाटेल तें म्हणा. कशानेंही माझें समाधान होत नाहीं कालच्या भयंकर प्रकारानंतर वाटतें, जग पशूंचें आहे. पशुवृत्तीनें बुजबुजलेलें आहे.

**ओपल**:—फार भावनावश होऊन चालायचें नाहीं वहिनीसाहेब !

**रूपा**:—साहेब काका ! मला तुम्ही भावनावश म्हणावें ? आश्चर्य वाटतें मला ! तुमच्या ईश्वरानें म्हणा नाही तर त्याच्या सुपुत्रानें—मानवानें म्हणा, स्त्रियांच्या बाबतींत अघोर अन्याय चालविले आहेत. तुम्ही म्हणतांना विवाहसंस्था पवित्र आहे म्हणून ! पण त्याच पावित्र्याच्या कल्पनेनें वेडा-

वलेल्या पुरुषांनीं आपल्या पत्नीच्या शरीरावर–किंवा शरिराच्या कांहीं भागांवर मालकी हक्क निर्माण करून ठेवला आहे. कायद्यानें न्याय्य असेल तें–कारण पुरुषांनीं कायदे केले आहेत ना ते! पण मी विचारते हें खरोखरच न्याय्य आहे का? एकानें दुसऱ्या व्यक्तीच्या शरीरावर हक्क सांगणें हा रानटीपणा नव्हे कां? देवाच्या मनांत हा रानटीपणा फोंफावत राहावा असे अभिप्रेत आहे का?

**नीलाः**—पण निसर्गाला तरी जरा विवेक हवा होता!

**ओपलः**—न्याय्य नि निसर्ग आंधळे आहेत.

**रूपाः**—नि पुरुष नाहींत वाटतें आंधळे? आम्हां स्त्रियांचें दुर्दैव! त्यांनीं कसे अगदीं शिगोशिग भरून ठेवलेंय! कुमारिकांची किंवा विधवांची विकारपूर्ति पापाच्या पराकोटीला लोटून दिली–आणि विवाहितांना मात्र जगानें पुण्याचा परवाना देऊन थेट स्वर्गाच्या गाभाऱ्यांत घुसडलें आहे.

**ओपलः**—खरें आहे! निसर्ग पुरुषांचा पक्षपाती आहे हें अगदीं खरं आहे.

**रूपाः**—( त्याच स्वरांत–थांबून ) एका वाक्यांत सांगूं कां? आम्ही स्त्रिया पुरुषांच्या आजीव गुलाम आहोंत. त्यांच्या हक्काचें सुंदरसें खेळणें आहोंत.

**नीलाः**—कित्ती–कित्ती तूं बरोबर बोलते आहेस वैनी! माझ्याच मनांतलें जणूं बोलून दाखवीत आहेस तूं!...

( दाराची घंटी वाजते )–( रूपा दार उघडते )

**जवाहरः**—( बाहेरून आंत येत ) हॅलो-रूप... रूपा! रूपा! हे पहा आणले आहेत आपले फोटो! नि त्या बघ स्वीमिंगपूलच्या वार्षिक सभासदत्वाच्या दोघांच्या पावत्या. आतां आपल्याला कुणाचे गेस्ट म्हणून जायला नको. खरेंना!... आतां आपण पोहूंच पोहूं! ( रूपा खोटं हसूं आणते ) नि, हें पहाना... ( पार्सल सोडीत ) हा बघ तुझा फोटो... ( तो तिच्या हातीं देत) पहाना कशी छान दिसतेस ती! (नीलाला तो फोटो ओझरतां दिसतांच ती आंत निघून जाते... ओपल बाजूला उभा रहातो) तूं आज अशी कां? बरं नाहीं कां तुला?

**रूपाः**—( तो फोटो समोर धरीत ) साहेबकाका ! पहा पुरुष आपल्या खेळण्याशीं कसे वागतात ते ! ( ती तो फोटो ओपलसमोर धरते ) म्हणत होते ना मी कीं स्त्री म्हणजे पुरुषांच्या शोभेची वस्तु ! सांगा काका— या स्वीमींग कास्ट्यूममध्यें मी सुंदर दिसते कीं आत्ताच्या या गोल पातळांत ?

**जवाहरः**—( ओपलसमोरची ती तसबीर खेंचून ) रूपा ! तुझी खुषी नव्हती ? तूं आनंदानें फोटोला उभी राहिली नव्हतीस ?

**रूपाः**—तुम्ही आपल्या समाधानासाठीं तसा अनुकूल ग्रह करून घेतला आहे. खरें सांगूं ? माझी तशी इच्छा नव्हती—(ओपल पाईप पेटवितो)

**जवाहरः**—पण तूं आपला विरोध दाखविला असतास तर . . . !

**रूपाः**—दाखविला होता. नीट आठवण करा ! पण तुम्हाला माझा तो विनय वाटला—मी आपली थट्टा करतेय असं वाटलं तुम्हाला. तेव्हां विचार केला, ज्याच्यावर आपलें आयुष्य अवलंबून आहे अशा आपल्या पतीचें मन कां दुखवा थोडक्यासाठीं ? नवऱ्याची मर्जी सांभाळणें हा आम्हा बायकांच्या पोटापाण्याचा प्रश्न आहे.

**जवाहरः**—( रागावतो ) तुम्हा बायकांना जणूं पुरुषांची गरजच नसते !

**रूपाः**—असते—म्हणून काय पुरुषांनीं मऊ लागलें म्हणून अगदीं कोंपरानें खणायचें ?

**जवाहरः**—अस्से ! असे तुझे विचार आहेत तर ! पण मी विचारतो तूं माझ्याशीं लग्न करायचें नव्हतेस !

**रूपाः**—तेंच तर माणसाला कळत नसते अगोदर ! ओपलकाका ! आपल्या वृद्ध आप्तांचा अनुभव घेऊन तरुणतरुणीनें वागावें असें एकादें यंत्र निघेल तर किती उपकार होतील या जगावर. पण तें शक्य दिसत नाहीं तरुणांना वृद्धांचा सल्ला कधीं रुचला आहे का ?

**जवाहरः**—तूं कां नाहीं वागलीस एकाद्या म्हाताऱ्याच्या सल्ल्यानें ?

**रूपाः**—लग्नापूर्वीं तरुणतरुणी आंधळीं असतात नि दुबळींही असतात. लग्न करतांना त्यांना भविष्यांतील उज्ज्वल आशांशिवाय दुसरें कांहीं दिसत नसतें.

जवाहर:— ( चटकन भानावर येऊन ते फोटो गुंडाळून घेतो कागदांत ) चांगले विचार आहेत तुझे रूपादेवी ! एकूण तुला आपलें आयुष्य कष्टाचें गेलेलें दिसतंय. दुःखही झालेलें असेल. कदाचीत नीलाप्रमाणें जीव द्यावा असेंही तुझ्या मनांत येऊन गेलें असेल ( चटकन जातो. )

रूपा:—( उगीचच हंसत ) संपला कीं नाहीं तंबाखू तुमच्या पाइप-मधला ?

ओपल:—( पाहून ) हो संपला.

रूपा:—दुसरा भरा हवा असल्यास ! भराना !

ओपल:—( आश्चर्यानें ) म्हणजे ?

रूपा:—( हसते ) पुरुषांना आम्ही बायका तंबाखूप्रमाणें आहोंत—आजच्या आधुनिक कालांत बोलायचें म्हणजे सिग्रेटप्रमाणें आहोंत. लज्जत संपली कीं अर्धी जळलेली फेंकून देतील—आणि लगेच दुसरी शिलगावतील.

ओपल:—खरें आहे वैनीसाहेब ! ( पाईप ठेवतो ) माणसाच्या मनांतील विचार तुम्ही अचूक ओळखता—पण क्षमा करा—तुमचा प्रश्न गंभीर होतोय अशी भीति वाटते मला.

रूपा—तुम्हीं पण बरोबर ओळखलंत् काका—

ओपल:—एकांगीपणानें प्रश्न सुटत नाहींत वैनी. जास्त गुंतागुंत होते त्याची !

रूपा:—( आवेशानें ) आपल्या पोटच्या मुलीवर बंदुक रोंखण्यास ज्यांनीं मागें पाहिलें नाहीं त्यांच्या घरांत माझ्यासारखीचें कसें निभायचें ? ( हताश होऊन एकदम बसते )

ओपल:—असे एक घांव दोन तुकडे अशा वृत्तीनें पाहूं नका परि-स्थितीकडे. माणसाच्या मनावर संस्काराचें दडपण नसतांना जागृत झालेल्या त्याच्या भावना पराकोटीला पोचतात. त्याला अनावर होतात त्या ! तो त्यांना बळी पडतो—नि त्याच्या हातून अनपेक्षित आचार घडतात !

रूपा:—पण तुम्हीं म्हणता त्याप्रमाणें आतां त्यांच्यावर चांगले संस्कार होईपर्यंत वाट पहात अनिश्चित कालपर्यंत कुजत बसण्याची माझी इच्छा नाहीं.

**ओपल:**—ईश्वराची मर्जी.

**माणिक:**—कसं हो म्हणता तुम्ही काका ? वर हीं कितीही श्रेष्ठ साधूसंतांचीं वचनें लोंबकळत ठेवलीं, तरी खालीं हे येथचे नागडे उघडे पुतळे जोंपर्यंत आपल्या तरारलेल्या नजरेनें जगाकडे पहात आहेत तोंपर्यंत नीलाताईचें मन शांत राहणें शक्य होतें ? त्यांत नवीन जोडप्याचे उत्तान प्रेमाचे चाळे घरांत उघड उघड नीलाच्या नजरेस पडत असतांना तिचें मन उफाळून जाऊं नये हें शक्य होतें काय ?

**ओपल:**—या दोन दिवसांत या घरांत उल्कापात होऊन मोठे फरक घडून आले आहेत माणीक !

**पाचू:**—माणिक ! साहेबकाका खोटं नाहीं बोलायचे. चला-येताना ?

**माणिक:**—( उसासा टाकीत ) चल ! उगाच कशाला बसा ? ( ते दोघेहि निघतात. )

**ओपल:**—पण चहा येतोय् ना ? ( ती थांबतात ) बसा, आतां येईल... ( ओपल निराळया दृष्टीनें त्या पुतळयांकडे पाहतो . . . त्याला माणिकचे म्हणणें बरोबर आहे असें पटून तो त्यांच्याकडे मधूनमधून बघतो. )

**रत्ना:**—( चहा घेऊन येतो. )

**रूपा**—( त्याच्या मागोमाग प्रवेश करते ) जा तूं रत्ना ! ( रूपा चहा करूं लागते. )

**ओपल:**—मी करूं का मदत ?

**रूपा:**—कराना !

**ओपल:**—( सर्वांना चहा देतो. )

**पाचू:**—( पुढें येऊन घेत ) बाटवले ना तुम्ही काका आम्हांला !

**ओपल:**—सारी दुनियाच बाटली आहे अलिकडे !

**माणिक:**—फार उकडतय् आज नाहीं ?

**पाचू:**—होय ना !

**रूपा:**—( मुद्दाम ) हवा अगदी सर्द झालीय्, नाहीं ?

**ओपल:**—होय. आहेच आज ( आपल्या कोटाचीं बटणें लावून घेतो ) ( सर्वजण हंसतात )

पाचूः—घरेंसुद्धा एअर–कंडीशण्ड्चीं बांधायला हवींत.

रूपाः—तुम्हीच सुरवात करा !

माणिक.—सध्या एअरकंडीशण्ड मनोरथ बांधीत आहोंत आम्ही !

पाचूः—अगदीं रोमेलच्या एअर कंडीशण्ड् टॅंक्सप्रमाणें, नाहीं ?

ओपलः—युद्धाचा काय निकाल लागणार बुवा ?

रूपाः—काय लागायचा तो लागूं दे ! पण आपल्या हिंदुस्थानचें काय होणार आहे ?

माणिकः—त्यासाठींच तर महान् आंदोलन चालूं आहे ना

ओपलः—चालू होतें म्हणा !

माणिकः—नाहीं. चालूच आहे. वृद्धांची पराभवी मनोवृत्ती आम्ही तरुण मान्य करणार नाहीं. कोठलीही क्रांति कधीं फुकट गेली आहे काय ? सांगाना ?

रूपाः—वातावरण गरम झालय् चहानें. आतां मात्र जपानचे बॉंबस् पडणारसे वाटतय्.

माणिकः—त्या जपान्यांचे नांव काढू नका आम्हां तरुणांसमोर !

पाचूः—(उठून–त्याला उठवीत) चला...कांहींतरी करून दाखवा अगोदर. मग बोला.

ओपलः—अगोदर लग्न तर उरकून घ्या ! मग दुसऱ्या गोष्टी !

रूपाः—साहेबकाका ! तें मात्र अलिकडच्या तरुणांना सांगायलाच नको. दुसरें कांही जरी तरुणांनीं केलें नाहीं तरी ते लग्न केल्याशिवाय राह्यचे नाहींत. त्यांत ते पटाईत आहेत. जीव देतील पण बायको मिळवतील.

( माणिक पाचू—बरं बरं करीत निघून जातात. )

रूपाः—साहेबकाका ! काय दिला सल्ला वन्संना ?

ओपलः—काय देणार–? जरा थांबून वाट पाहिली पाहिजे !

रूपाः—काय होईल तें होईल असें म्हणून नाहीं भागायचें. कांहीं तरी हेतूपूर्वक असा तावडतोब निर्णय घ्यायला हवाय्, याची जाणीव मला चैन पडूं देत नाहीं...

ओपलः—(आश्चर्यानें) काय आहे काय तुमच्या मनांत ? (कॉल-

बेल वाजते. मोतीराम शेठ-नंतर मागाहून पोखराज शेठ प्रवेश करतात )

**पोखराजः**—( ओपलशीं शेखहँड करीत ) सलाम साहेब ! तुम्ही येथं आहां हें बरं झालं.

**मोतीरामः**—( एकदम ) काय बोलायचं तें बोला पाहूं शेठसाहेब ! ( रूपा जाते. )

**पोखराजः**— हँ. हँ. हँ हँ. . . म्हटलं अशा गोष्टी तुमच्या हपीसांत नकोत बोलायला. म्हणून आपल्या बंगल्यावर आलोय मी...हँ. हँ हँ... जास्त काय बोलणार ? आमच्या गरीब कंपनीची इभ्रत राखा...नाहींतर आम्हाला तोंड काढायला जागा राहणार नाहीं.

**मोतीरामः**—आम्ही काय करावं हा आमचा प्रश्न आहे.

**पोखराजः**—( सावकाश ) तुम्हाला या साहेबांनीं कळविलें असेलच.

**मोतीरामः**—हो ! केवळ कमीशनची रक्कम घेऊन कोंदणे कंपनीचें नांव वाढणार नाहीं.

**पोखराजः**—(चिडून) शेटसाब ! नांव वाढण्याच्या गोष्टी सोडून द्या आता. जग उलटें फिरायला वेळ लागत नसतो.

**मोतीरामः**—( गर्वानें ) अरे जा रे ! असे छपन्न बघितलेत मी !! कोणाची माय व्यायलेय माझ्याविरुद्ध जायची या ठाण्यांत ?

**पोखराजः**—शेठसाब ! जरा स्पष्ट बोलतो म्हणून रागावूं नका ! हँ...हँ ... ( हळूंच ) आज सकाळची तुमच्या पोरीची भानगड कळली आहे मला.

**मोतिरामः**—( बसून ) त्याचा माझ्या धंद्याशीं संबंध काय ?

**पोखराजः**—(हसत) नांवाशीं तर आहे. तो तुमचा मोठेपणा आज कुठं आहे ?

**ओपलः**—(जवळ येत) पोखराज शेठ ! कशाला गोष्टी काढतां त्या ? आज जी गोष्ट ! आमच्या शेठच्या घरांत घडली, ती कुणाच्याही घरांत घडणें शक्य आहे. उद्यां कदाचित् तुमच्याही—

**पोखराजः**—अरे जा ! आमच्या मुलीबाळी काय हलक्या कुळां-तल्या आहेत ? आम्ही खानदान घराण्यांत जन्मलों आहोंत.

**मोतिरामः**—( संतापून ) पोखराज शेठ ! मूर्खासारखे घराण्याच्या गोष्टी कशाला आणतां पुढें ? दैवायत्तं कुले जन्म—मदायत्तं तु पौरुषम् ! नि आज मी माझा पराक्रम गाजवून तुमच्यापुढें उभा आहे, म्हणून तर तुम्ही आज माझ्या घरीं येऊन माझ्या पायांशीं याचना करीत आहां . . . मोठ्या खानदानीच्या गोष्टी कोणापुढें बोलतां तुम्ही ?

**पोखराजः**—याचना नाहीं करीत मी. शेटसाब ! माझी मागणी आहे ती ! ती मान्य केल्याशिवाय गत्यंतर नाहीं तुम्हाला, समजला ! शेठ उगाच डोक्यांत राख घालून घेऊं नका. उद्यां ठाण्याची बाजारपेठ कशी हालेल तें ध्यानांत आणा. ( उठून ) येत्या चोवीस तासांत पेण खार-पाडा पुलाचें कॉन्ट्रॅक्ट आमच्या नांवावर तुम्ही ट्रॅन्सफर केलें नाहीं तर . . आपल्या मुलीची सारी हकीकत ठाण्याच्या डी. एस्. पी. ला कळवीन . . एकदम वर चढलेलें तुमचें नांव धुळीला मिळेल . . .

**मोतीः**—काय . . . काय ?

**पोखराजः**—हँ . . हँ . . हँ . . घाबरूं नका. विचार करा. आपलें नांव नि पैसा यांतून काय निवडायचें ते तुमचें तुम्हीच ठरवा. त्यावरूनच तुमच्या कुळाची किंमत ठरणार आहे. ( ओपलला ) साहेब ! तुम्ही शांत डोक्याचे नि सभ्य गृहस्थ आहां. यांना योग्य तो सल्ला द्या . . ( एकदम ) बराय् . . नमस्कार . . ( जातो—मोतीराम त्या दिशेकडे स्तिमित दृष्टीनें पाहतो )

**मोतीरामः**— ( डोक्यावर हात मारून घेत सोफ्यावर बसतो ). कार्टीनें माझा सत्यानाश केला. जीव दिलान् ती टार तरी मेली असती तर छान झालें असतें !

**ओपलः**—मी पाहतो पोखराज शेठना बाहेर भेटून, त्यांची कांहीं समजूत घालतां आली तर. ते गेले नसतील अजून !... ( जातांना, परत फिरून ) तोंवर घरांत आणखी बोलून कांहीं घोटाळा करूं नका. ( ओपल जातो. )

**मोतीरामः**—कोण आहेरे तिकडे ? ( रत्ना येतो ) सगळीं माणसं गेलीं कुठं ? ( आपल्या म्लान चेहऱ्यावरचा घाम पुसत उठतो. )

रत्नाः—जी. मी आहे नव्हे कां ?

मोतीरामः—( आंत जातांना ) चहा घेऊन ये आंत. . . ( जाऊं लागतो. )

रत्नाः—आज तब्येत खराब दिसतेय तुमची !

मोतीरामः—कांहीं नाहीं होत मला.

रत्नाः—नाहीं पण.. पण माणसानं सारखं सारखं रागावणं बरें नाहीं.

मोतीरामः—पुरें कर तुझा चोंबडेपणा...रत्ना ! तूं आपल्या पायरीनें वागत जा इथं... नाहींतर ढुंगणावर लाथा मारून घालवून देईन. ( जातो )

रत्नाः—( त्यांच्यासारखे दाण दाण पाय आपटीत स्टेजवर चालतो—नंतर मोतीराम शेटसारखा आंत जातो. )

( नीला प्रवेश करते—डावा हात पूर्वीप्रमाणें स्विंगमध्यें आहे. दोन्ही बाजूचे तीनही दरवाजे बंद करते. हातांतील तसबिरीकडे पाहून नंतर समोरील आपल्या आईच्या एन्लार्ज्ड फोटोकडे पहाते. तिला तो मोठाच फोटो पसंत पडतो. ती टेबलावर चढते...तो आईचा फोटो काढते—दुसऱ्या बाजूला असलेल्या मोतीरामच्या फोटोकडे पाहते...रागानें त्यावरील फुलांची माळ तोडून खालीं उतरते— ( तों कॉलबेल वाजते. ) घाईनें त्या दोन्ही तसबिरी आटोपून पळून जाते...पण परत फिरून आंतील दारांच्या कड्या काढून चटकन् नाहींशी होते. ( पुन्हा घंटी )

रत्नाः—( प्रवेश करून ) कोण आहे ? ( दरवाजा उघडतो )

ओपलः—( मंगलला बरोबर घेऊन प्रवेश करतो ) शेठ काय करताहेत?

रत्नाः—आहेत आंत.

ओपलः—पाठवून दे त्यांना. ( रत्ना मंगलकडे बघत निघून जातो ) कुठें होता इतके दिवस मगल ?

मंगलः—होतो मुंबईंत.

ओपलः—कांहीं उद्योग ?

मंगलः—यंदाच तर बी. ए. झालों. त्यांतूनही थोडा कमिशन उद्योग करतो.

**ओपलः**—छान—व्यापारासारखी मजा नाहीं . . ( थांबून ) पण काय हो मंगल ? तुम्ही शेक्सपीयर वाचला असाल !

**मंगलः**—हो ना . .

**ओपलः** —त्याचें तें रोमीयो ज्युलीएट वाचलें ?

**मंगलः**—वा. फारच चांगलें नाटक आहे तें . . हृदयाला चटका लावतें अगदीं.

**ओपलः**—छान . . तुम्ही म्हणे नीलावर प्रेम केलें . . .

**मंगलः**—अजूनही तसेंच आहे . .

**ओपलः**—मला नाहीं खरं वाटत !

**मंगलः**—कां ?

**ओपलः**—तिला भेटल्याशिवाय कसे राहूं शकला तुम्ही वर्षभर ?

**मंगलः**—म्हटलं...माझ्यामुळं घरांत वितुष्ट यायला नको त्यांच्या !

**ओपलः**—अहारे बावळट.. !तुम्ही अलिकडचे तरुण प्रेम करतां—पण पूर्वीच्या तरुणांचें धाडस नाहीं तुमच्यांत...कुठें रोमियो नि कुठें... ?

**मंगलः**—मग काय घरांतून पळवून न्यायला हवी होती तिला ?

**ओपलः**—काय बिघडलें असतें ?... फार विचार करीत बसूं नये तरुणांनीं प्रेमाच्या बाबतींत !

**मोतीरामः**—( प्रवेश करतो-चेहरा उतरलेला . . . चिंताग्रस्त ) काय काम आहे सायबा !

**ओपलः**—हे मंगल. ( मंगल त्यांना नमस्कार करतो )

**मोतीरामः**—कोण मंगल ?

**ओपलः**—मन जरा शांत होऊ द्या आपलें ( थांबून ) नीला कॉलेजमध्यें होतीना- तिचे हे मित्र.

**मोतीरामः**—हाच काय तो प्राणी आमच्या नीलीवर प्रेम करीत होता म्हणे !

**ओपलः**—( मानेनें होकारा देत ) भेटायला आलेत आपल्याला.

**मोतीरामः**—बोला ! ( रत्ना चहा आणतो . . सर्वांना देतो निघून जातो. )

**ओपल:**—थांबा ना. बोलूं सावकाश.

**मोतीराम:**—( चिडून ) माझं डोकं दुखतंय! झटकन् बोला काय तें.

**ओपल:**—पोखराज शेठ कांहींहि ऐकायला तयार नाहींत.

**मोती:**—बरं!

**ओपल:**—पण त्यांची नांगी मोडतां येईल आपल्याला.

**मोती:**—ती कशी?

**ओपल:**—हे मंगल नीलाताईशीं लग्न करायला तयार आहेत.

**मोती:**—यासाठीं कां या ग्रहाचा उदय झालाय इथं?

**ओपल:**—आतां असं बेपर्वाईनें बोलून चालायचें नाहीं शेठ. शांतपणें विचार करा. शक्य तितक्या लौकर या दोघांचा विवाह करून टाकूं ...म्हणजे पोखराज शेठच्या तंगड्या उलट्या त्यांच्याच गळ्यांत अडकतील.

**मोतीराम:**—( विचार करतो–त्याला एकदम पटतें ) असं आहे का.. ( मंगलशीं शेकहॅंड करतो ) कायरे खरंच?

**मंगल:**—मी मागणीच घालायला आलोय आपल्यापाशीं.

**मोतीराम:**–(छाती पुढें काढून) आनंद आहे...सायबा! यांच्याशीं काय ठरवायचं तें ठरवून टाक. ( कानाशीं ) वाटल्यास पाच पन्नास हजार रुपये हुंडा देऊं म्हणून कबूल कर! पण ठरविल्याशिवाय जाऊं नकोस याला. हं!

**मंगल:**—( ऐकून ) शेठसाहेब. माझ्या मनगटांत धमक आहे... मला तुमची नीला पाहिजे पैसा नको.

**मोतीराम:** मोठा ध्येयवादी दिसतोस तूं! प्रोफेसर आहेस कीं काय नीला होती त्या कॉलेजांत?

**ओपल:**—तुम्ही विश्रांति घ्या–जा! प्रथम नीलाला विचारतो ती काय म्हणते तें.

**मोतीराम:**—( ओरडून ) तिला काय विचारायचें? आतां नकोत तिच्या पत्राजा एवढ्या...! ( जातो )

**ओपल:** – ( आंतील घंटी वाजवितो, रत्ना येतो. ) नीलाला पाठवून दे इकडे. ( रत्ना जातो )

**मंगल:**—शेठसाहेबांना वाटतंय कीं मी पैशाच्या लालचेनें लग्नाला तयार झालों आहे. हा माझा अपमान आहे.

**ओपल:**—तुझें म्हणणें खरें आहे पोरा. पण दिलेच त्यांनीं तर कां घेऊं नयेस ?

**मंगल:**—मला लग्नावर कमिशन नाहीं मिळवायचें.

**ओपल:**—बरं. ( थांबून ) माणिकराव भेटले होते तुम्हाला ?

**मंगल:**—साहेब ! कशाला आडून विचारतां. . . ? मला कळलंय् माझी नीला संकटांत आहे म्हणून.

**ओपल:**—( त्याची पाठ थोपटून ) शाबास आतां खरा आधुनिक तरुण शोभतोस तूं-( रूपा निश्चयी मुद्रेनें प्रवेशते. ) हे मंगल आले आहेत.

**रूपा:**—( मंगलला ) हेच का ते मगल ? कां आलांत ?

**ओपल:**—नीला नाहीं आली ती—

**रूपा:**—तिच्या यायची जरुरी नाहीं.

**ओपल:**—म्हणजे . . . कुटुंबावर आलेल्या प्रसंगांतून निभावण्याचा मी मार्ग शोधतोय्—नि तुम्ही—

**रूपा:**—तुमचा मार्ग अपुरा ठरणार आहे, काका !

**मंगल:**—पण प्रत्यक्ष नीला भेटती तर...तर.

**रूपा:**—मंगल ! तीन दिवस उशिरां आलास तूं ? आतां नीला, नीला राहिली नाहीं आतां निला कोणाच्या दयेची जरुरी नाहीं.

**मंगल:**—मी नाहीं समजलो काय म्हणतां तें !

**रूपा:**—भर आयुष्यांत येणार नाहींत असे अनुभव गेल्या तीन दिवसांत घेतले आहेत बन्सनीं...

**मंगल:**—मला कळलंय सारं. माझ्याविषयीं मुळींच शंका घेऊं नका तुम्ही . . . तिच्या हजारो अपराधांची क्षमा करण्याइतकी ताकत माझ्या गाढ प्रेमांत आहे. मोती वेजीं गेलें म्हणून त्याची किंमत कमी नाहीं होत.

**रूपा:**—कविराज ! या बोलायच्या गोष्टी आहेत.

**मंगल:**—नाहीं-नाहीं..रूपाताई मी अगदीं हृदयापासून बोलत आहे.

**ओपलः**—वैनी ! शांतपणें विचार करा. परिस्थिति पहा. तिचा जर तिच्या एककाळच्या प्रियकराशीं विवाह झाला...तर तर–सर्वांचें कल्याण आहे त्यांत...कुटुंबाची इभ्रत राखली जाणार आहे.

**रूपाः**—काका...कुटुंबाची इभ्रत त्यांनीं एकट्यानींच राखायला पाहिजे इतकी मोठी जबाबदारी त्यांच्यावर टाकूं नका.

**मंगलः**—पण तिचा भागीदार व्हायला एका पायावर तयार आहे मी.

**रूपाः**—( रोखून ) मंगल तुम्हाला कांहींच कसें वाटत नाहीं ? तुमचें नि वन्संचें निस्सीम प्रेम असतांही, तुम्ही केवळ गरीब म्हणून ज्यांना तुम्ही नकोसे होता—ज्यांनीं तुमचा असा अपमान केला . . . श्रीमंतीच्या मस्तीनें ज्यांनीं तुम्हाला ठोकरा दिल्या—

**मंगलः**—त्यांचीच तर आतां कबुली आहे.

**रूपाः**—आतांच कां त्यांना अशी सुबुद्धि सुचली ?

**ओपलः**—<br>**मंगलः**— } परिस्थितीमुळें !

**रूपाः**—पण नीच परिस्थिति तुम्हाला–वन्संना मारक ठरणार आहे याचा तुम्ही विचार केला नाहीं. आज त्यांचे पालक आलेल्या संकटांतून मोकळ होण्यासाठीं तुम्हाला हजारो रुपये देऊनसुद्धां एकदम श्रीमंत करतील.

**ओपलः**—बापाची माया आहे वैनी—तिला पाझर फुटल्याशिवाय कसा राहील ?

**रूपाः**—अस्से ! मंगल ! इतक्या गोष्टी ठरवूनच तुम्ही माझ्याशीं बोलत आहां तर ?

**मंगलः**—ते वाटेल तें बोलोत. मी एक कवडीही स्वीकारणार नाहीं त्यांची.

**रूपाः**—( विचार करून ) लग्न सुखाचें व्हायला पैसे भरपूर हवे असतात.

**मंगलः**—मला नाहीं वाटत तसें.

**रूपाः**—तेंच उत्तर मला हवं होतं ! अविचारानें तुम्ही बोलत आहांत आज.

मंगलः—पण आमचें लग्न झालें म्हणजे—

रूपाः—खुळचट कल्पनांवर मनोराज्य करूं नका. यापुढें तुमचं आणि वन्संचं जमणं शक्य नाहीं. ( मंगल दचकतो. )

ओपलः—हें काय बोलतां आहां वैनी अविचारानें ?

रूपाः—काका तुम्ही समंजस आहां. खूप पावसाळे काढले आहेत तुम्ही या जगांत! मी स्पष्टपणें विचारतेय् त्या प्रश्नांचीं उत्तरें द्या. वन्संना होणारें बालक कायद्यानें आतां जन्मास आलें पाहिजे ?

ओपलः—होय.

रूपाः—तें जन्मास आल्यानंतर त्याला मारून टाकणें राक्षसीपणाचें ठरेल—शिवाय त्यांची मान लटकेल ?

ओपलः—होय—खरं आहे.

रूपाः—त्याला जिवंत राहूं द्यायचें असेल तितके दिवस त्यांनीं त्याला आईच्या मायेनें संभाळलें पाहिजे ना ?

ओपलः—होय.

मंगलः—पण माझी कुठांय् ना त्याला ?

रूपाः—पण मंगल! तें बालक जेव्हां जेव्हां तुमच्या नजरेस पडेल तेव्हां तें कुणाचें ? हा प्रश्न तुमच्या मनांत उत्पन्न होणार नाहीं ? ( मंगल बुचकळ्यांत पडतो ) बोलाना ? आज तुम्ही जो त्याग करतां आहां तो तुम्हाला भारी वाटेल त्यावेळीं. कदाचित् अशी जिज्ञासा तुमच्या हृदयांत दाटून आली तरी, वन्संच्या मनाला दुःख होऊं नये म्हणून तुम्ही त्यांना विचारणार नाहीं हें मी मान्य करते...अन् तुम्ही जरी त्यांना तसें विचारलेंत तरी त्या प्राण गेला तरी तें सांगूं शकणार नाहींत हें पण तितकेंच खरें आहे...अशा स्थितींत तो कोण, तो कोण! असें तुमच्या मनांत सारखें येत असतां तुमचें वैवाहिक जीवन सुखाचें जाईल ? पटतं तुम्हाला ?

ओपलः—अशा स्थितींत अपत्यवती विधवेचा पुनर्विवाह अशक्य ठरेल! पण असे विवाह होतात. आणि ते सुखाचेहि ठरतात!

रूपाः—पण काका! त्या विधवेच्या नवऱ्याचें विवाहानें पावन झालेलें मूल असतं तें, अन् हें त्या दुसऱ्या नवऱ्याला पक्कें माहीत असतें.

ओपल:—या काल्पनिक अडचणी उत्पन्न करून नीलाच्या पुढें वाढून आलेलें सुखाचें ताट मागें लोटू नका तुम्ही !

रूपा:—तो त्यांचा प्रश्न आहे ! पण मी म्हणतें तें खरें ना ?

मंगल:— पण संवयीनें माणसांच्या मनांत काय फरक पडत नाहींत ? मला तें अंगवळणीं पडेल.

रूपा:—नाहीं...तसे विचार तुमच्या मनांत उत्पन्न होणें न होणें हें तुमच्या काबूत राहणार नाहीं. आजची तुमची दया—दातृत्व–प्रेम उद्यां पार सुकून त्याचा पाचोळा होईल.. तुम्ही पुरुष आहां. तुमचा अहंकार जागृत झाल्याशिवाय राहणार नाहीं. तुम्ही त्यांचा द्वेष करूं लागाल.. नि अशीहि वेळ येईल कदाचित् कीं तो कोण ? तो कोण...? या विचारानें तुमचें डोकें भणाणून जाईल !

ओपल:—वैनी···तुमच्या पण भावना उच्छृंखल होऊन परा-कोटीला पोचलेल्या दिसताहेत.

नीला:—( मागाहून प्रवेश करीत ) गैर बोलताहेत का वैनी ?

रूपा:—ही मी चाललें ... प्रत्यक्ष वन्संच काय तें बोलतील आतां. ( जाते. )

मंगल:—( पुढें येऊन ) नीला ... नीला ... मला तूं विसर-लीस ?

नीला:—वर्षानें भेटतो आहेस तूं मला...

मंगल:—पण हें तुझ्या हाताला काय झालें ?

नीला:—चालतांना पाऊल बाजूला पडलें नि मी या हातावरच पडलें .. ( विकटपणें हंसते. )

मंगल:— तूं अशी भकासपणें कां पहातेस माझ्याकडे ? तुझे ते प्रेमळ शांत हंसरे डोळे कुठें आहेत ? नीला . . नीला . . .

नीला:—गहाण पडले आहेत–बेमुदत करारानें.

ओपल:—कुणी भरवल्या या कल्पना तुझ्या डोक्यांत ?

नीला:—औरस बापानें–सख्या भावानें (स्लिंगमधील हात दाबीत) बाप मारेकरी ठरला–भाऊ कसाई ठरला. तेव्हांच डोळ्यांत माझ्या अंजन

पडलें. स्वप्नांतून जागी झाले होते मी, तेव्हांपासून अगदीं मघापर्यंत माझे डोळे दिपून गेले होते . . . भांबावून गेले होते मी . . . पण आतां मला माझा मार्ग सांपडला आहे . . काका . , तुम्ही म्हणाला होता त्याप्रमाणें जगाची पर्वा न करतां सरळ मार्गानें जाणार आहे मी.

ओपलः--ताई ! मांडलं आहेस तरी काय आज तूं ?

नीलाः--लहानपणापासून चेंगरलेल्या या माझ्या मनाला आज कंठ फुटलाय् . . . तें आक्रोश करूं पहातय् !

ओपलः—( तिच्या जवळ जाऊन तिचें डोकें आपल्या छातीवर घेऊन ) वेडी नाहींतर शांत हो जरा पाहूं ! तुझें तरुण रक्त अशा वेळीं सळसळून येणें सहाजिक आहे, पण शांत हो बघूं.

मोतीरामः—( खुषींत प्रवेशतो ) ठरलें सर्व कांहीं सुरळीत ?

ओपलः—( आतां घोटाळा झाला असा चेहरा करतो— नीला दूर होते )

मंगल—तुम्ही जरा आणखी वेळ द्याल का आम्हाला ?

मोतीरामः—म्हणजे ? ही तयार होत नाही ? काय ग ए ! ( साहेबाला ) तिचं काय ऐकतां तुम्ही ? कान धरून लग्नाला उभी करतो मी हिला.

नीलाः—मी मंगलशीं लग्न करणार नाहीं. साफ सांगते !

मोतीः—( संतापून ) कारटे मला उत्तर करतेस ?

नीलाः—होय !

मोतीः--चौदावें रत्न दाखविलें नाहीं तोंवर !

नीलाः—तुमच्या ताब्यांत आहे तों करीन तें मी सहन मेरपर्यंत.

मोतीः—करंटे ! शेण खाऊनच्या खाऊन मुजोरीची भाषा कुणापुढें करतेस ?

नीलाः—( उसळून ) चूप बसा. एक शब्द बोलूं देणार नाहीं पुढें ! वहिनी काय घरांत शेण खात असते ? माझ्या आईनें शेण खाल्लें म्हणून मी जन्मास आलें ?

मोतीः--नीली-नीली ! ! !

नीलाः--मला ठाऊक आहे काय बोलणार तुम्ही तें. तुमच्या इभ्रतीच्या मांडवाखालीं सर्वांना ऐश्वर्य दाखवीत चार भटांनीं माझ्यावर अक्षता उधळल्या नाहींत म्हणून...म्हणून उतावीळपणें माझ्यावर पापकर्माचा ठसा मारतांना ( मधेंच स्फुंदते ) कांहीं काळपर्यंत तरी वाट पाहला हवी होती तुम्ही.

मोतीः--कुठं शिकलीस या अनैतिक पाखंडी गोष्टी ?

नीलाः --( जाऊं लागते )

मोतीः—( तिच्या दंडाला धरीत ) थांब ! कोठें निघालीस ?

नीलाः --( हात हिसकावून सोडवून घेऊन आंत जाते ).

मोतीः --( साहेबाला ) ही एवढी पिसाळली कां ?

ओपलः--( चीड दाबून ) मंगलनें सांगितलें होते ना जरा आम्हाला बोलूं द्या म्हणून. पण आपल्याला नाहीं निघाला धीर ! ती आतां जास्त चिडलीय्.

मोतीरामः—(त्याच्याकडे बघत) साहेबा ! तूं का हें बोलत आहेस ?

ओपलः—आमच्यावर सोंपविलेल्या गोष्टींत तुम्हाला एव्हांशी पडण्याचें कारण नव्हतें. तुमच्या कालच्या प्रकारानें बेचैन झालेली नीलाताई एकदम थोडीच लग्नाला उभी राहूं शकली असती ? कांहीं घटना धीरानेंच घडाव्या लागतात. ( जवाहर टेनिसच्या सूटमध्यें रॅकेट घेऊन प्रवेश करतो)

मोतीः--पण मंगलशीं मी साफ लग्न करणार नाहीं असें बोलली आतां !

ओपलः—बोलली असेल ती रागाच्या भरांत. तें खरें का धरायचें ?

मोतीः--माझ्या आयुष्यांत अशी दुहेरी भाषा ऐकण्याची संवय नाहीं मला. मनांत असेल तें बोलायचें. मनाला पटेल तें करायचें !

रूपाः--( प्रवेश करते ) मनांत असेल तें बोलायचें. मनाला पटेल तें करायचें असें दुसऱ्यांना पण वाटत असतं.

जवाहरः—रूपा ! असं काय बोलतेस ? बाबांना काय वाटेल ?

रूपाः—खरं जग दत्त म्हणून आपणा सर्वांपुढें उभें राहलेय्. मग कुणाला कांहींही वाटो !

**जवाहर**:—हिलाही शिंगें फुटलीं आहेत आज.

**रूपा**:—नि तीं आपलें पाणी दाखविण्यासाठीं शिवशिवताहेत अगदीं!

**मोती**:—कोणासमोर बोलतां आहां तुम्हीं?

**ओपल**:—माफ करा शेठ! बोलूंद्या त्यांना काय बोलायचेंय् तें. बोलून बोलून त्यांचा जीव शांत झाला म्हणजे पुढचें संकट टळेल.

**रूपा**:—पण आलेल्यानें तरी डोळ्यावरची झांपड दूर झाली का?

**जवाहर**:—( तिच्या आंगावर उसळून ) चूप बसतें कीं नाहीं?

**रूपा**:—दिवे ओवाळा—घरांतील बायकापुढेंच यांचें शौर्य!!

**जवाहर**:—काय बोललीस? ( हात उगारतो )

**मोती**:—ऐक–ऐक रे जरा!

**जवाहर**:—( जागेवर एकदम बसतो ) राहिलें आमचें. बायकोलाहि मी रागवायचें नाहीं?

**रूपा**:—( जवाहरसमोर जाऊन ) समजलं? केवळ पुस्तकी ज्ञान संस्कार पैदा करूं शकत नाहीं. ( मोतीरामकडे ) अन् पैसे घेऊन संस्काराचें दान करणारीं विद्यापीठें निघालीं नाहींत अजून नि उच्च समजल्या जाणाऱ्या समाजांत आपल्या चिरंजीवांनीं सरमिसळ करावी म्हणून पैशाची पिशवी मोकळी सोडूनहि भागत नसते.

**मोतीराम**:— रूपादेवी! भावनेच्या आवेगांत तुम्ही स्वतःच्या शिक्षणाविरुद्ध बोलतां आहां.

**रूपा**:—गैरसमज आहे आपला. माझ्या वडिलांनीं आपल्या स्वतःच्या अनुभवाच्या कांचेच्या घरांत मला उबवत ठेवली नाहीं. पतंग वर जावा असें वाटत असेल तर त्याला वाऱ्यावर सैल सोडायला हवा. त्याचा मांजा सारखा ताणून धरला तर तो पतंग गोते खातो–तुटतो हें त्यांना चांगलें माहीत होतं.

**मोतीराम**:—हं! मीहि माझ्या मुलांना सवलती दिल्यात.

**रूपा**:—कसल्या सवलती? वन्संसारख्या सदृढ तरुणींचें कॉलेज बंद केलें, त्यांचा प्रेम करण्याचा नैसर्गिक हक्क तुम्ही लुबाडून घेतला. तरुण तरुणी एकत्र आल्या म्हणजे आपणाला आवडणाऱ्या माणसावर तीं प्रेम

करणारच! कॉलेजचें शिक्षण देतांना हा धोका विचारांत घ्यायला नको होता का?...इतकें औदार्य नव्हतें तर...तर...

मोती:—रूपादेवी...

रूपा:—मला माहित आहे कीं माझें बोलणें आपणाला आवडत नाहीं... पण मी विचारतें...आपलीं मुलें घरांत वावरतात तीं माणसें आहेत, याची कदर कधीं केली आहे कां? केवळ त्यांना हवा तेवढा पैसा पुरवल्यानें भागलें कां? सदान् कदा धंदा, कारखाना, कॉन्ट्रॅक्टस्–रुपये याशिवाय कितीसे शब्द घरांत बोलत असतां? घरें म्हणजे धर्मशाळा किंवा हक्कांच्या खानावळी नाहींत. त्यांत मुलेंबाळें राहातात.. तीं दर दिवसागणिक वाढत असतात-त्यांना जें शिकवल जातें तें तीं शिकूं इच्छित असतात हें कधींतरी ध्यानांत आलें आहे कां? आपल्या कर्तत्वानें आपण मातीचें सोनें केलें असा अभिमान वाटतो आपल्याला..... पण आमच्या वागण्यानें उलटा प्रकार घडून आलाय्–

मोतीराम:—संपलें...संपलें? ( उपेक्षेनें हंसतो )

रूपा:—( चिडून ) संपलें! ( आंत जाते )

मोती:—कालचीं पोरें—नि मला शिकवताहेत!

जवाहर:—काय लक्ष देतां तिच्याकडे? वेडाची लहर आली आहे तिला एक.

ओपल:—वेड नाहीं तें...व्यक्तित्वाची जाणीव आहे ती.

जवाहर:—तुम्हीसुद्धां उलटलेले दिसताय् आमच्यावर...?

रूपा:—( हातांत एक चामडी बॅग आहे – मागाहून नीला येते–तिच्याहि डाव्या हातांत एक बॅग आहे...त्यांच्या मागाहून रत्ना येतो–त्याच्या काखोटीस दोन होल्डाल आहेत. )

मोती:—काय मांडलंय् तुम्ही हें आज?

रूपा:—कांहीं विशेष नाहीं! क्षमा करा मामंजी मला! (हसत) आपल्या ऐश्वर्याचें प्रदर्शन करण्यासाठीं दिवाणखान्यांत मांडून ठेवलेली ही तिजोरी आतां निश्चिंतपणें सांभाळीत बसा!

जवाहर:—कुठें निघालीस तूं?

रूपाः—जगण्यासाठीं... वन्संना जगविण्यासाठीं. ( रत्ना हळूच पुढच्या दरवाजांतून बाहेर पडतो. )

जवाहरः—पण हें घर टाकून ?

रूपाः—हें सोन्याचांदीचें घर आहे तुमचें ? वन्संसाठीं मला माणुसकीचें नवें घर शोधलें पाहिजे...

मोतीः—म्हणजे ? नीली...नीली... तूंही निघालीस ? ( नीला रूपामागोमाग जाऊं लागते ) नीले ! थांब. ( अडवून ) कुठें निघालीस ?

नीलाः—आमच्या नव्या घरीं... जेथें माझें बालक मला निर्भयपणानें वाढवितां येईल अशा आमच्या घरीं. ( दरवाजांतून बाहेर पडते. )

मंगलः—नीला...नीला असा अविचार करूं नकोस ! माझें ऐक ! ( तिच्यामागें जातो. )

मोतीरामः— ( दिङ्मूढ होऊन ) काय पाहतोय् हें मी ?

ओपलः—असें कांहीं होणार हें मला माहित होतें.

मोतीः–( अधिकारवाणीनें ) तुम्ही तें मला अगोदर कां नाहीं सांगितलें ?

ओपलः—मी सांगण्यापेक्षां समजायला हवें होतें आपणाला ! गेले तीन दिवस कांहीं तरी चांगलें व्हावें म्हणून मी झटलों. पण चौतीस वर्षे खाल्लेल्या आपल्या मिठाला मला जागतां आलें नाहीं... माझा इलाज हरला. ( हताशपणें खुर्चीवर बसतो— पण पुन्हा सेवकभावना जागृत होऊन मोतीरामपुढें पुन्हा उभा राहतो. )

मोतीः—जाजा – साहेबा...जा—पोरींना अगोदर घेऊन ये परत.

ओपलः—आतां आपल्याच्यानें जमायचें नाहीं तें.

मोतीः—( रागावून ) जवाहर—जवऱ्या—जा— जा – तूं त्यांना आडव ! जाऊं देऊं नकोस ! जा – ( जवाहर जातो )

ओपलः – अजूनहि सुविचार सुचत नाहींत !

मोतीः—( रिसिव्हर उचलतो ) पोलीसांना फोन करून त्या दोघींना पकडून ठेवा म्हणून सांगतो ( डायल फिरवतो )

ओपलः—शेठ ! विचार करा ! नीला—रूपाताई सज्ञान आहेत.

पोलीसांच्या हातीं हें प्रकरण गेलें तर पैशापरी पैसा जाऊन अब्रू कुणाची जाईल ?

मोतीः—( नाइलाजानें रिसिव्हर ठेवतो ) अब्रु—( एकदम बसतो ) इभ्रत ! !

रत्नाः—( प्रवेश करून आंतील बाजूस झटकन जातो )

जवाहरः—( घाईनें प्रवेशून ) नीली गेली—नीली गेली... !

मोतीरामः—कशी गेली ?

जवाहरः—मी तेथें जाऊन पोचतों तों...आपल्या पॅकार्डच्या स्टियरिंगवर बसून रूपा गियर मारीत होती...मी बोलणार तोंच तिनें मोटार भरधांव सोडली.

मोतीरामः—( मोठा श्वास सोडून—वैतागानें येरझारा घालतो ) साहेबा ! ( मध्येंच थांबून ) जा आतांच्या आत्तां जा, नि एक डबाभर रॉकेल ओतून, द्या आपला सारा कारखाना पेटवून—(एकेरीवर ) त्याची पुरी होळी झाली म्हणजे मी येतो बोंबा मारायला . . .

ओपलः—शेठ ! मन शांत ठेवा ... शांत व्हा ! वैतागण्यानें कांहीं साधणार नाहीं. ( श्वास सोडून जाऊ लागतो. )

मोतीरामः—( बसल्या जागेवरून ) सायबा !

ओपलः—( परत फिरून ) काय ?

जवाहरः—(कुत्सितपणानें) तुम्ही कांहीं बोलला नाहीं अजून काका?

मोतीरामः— ए गाढवा ! काळ वेळ कांहीं कळते कां तुला ?

जवाहरः—राहिलें आमचें ! आम्हांला कांहीं एक कळत नाहीं.

मोतीरामः—सायबा ! जाऊं देत पोरी गेल्या तरी ! तें कांही नाहीं. ( उठतो ) मी पुरुष आहे...असं रडत बसून चालणार नाहीं. सर्व कांहीं विसरलं पाहिजे मला...( थांबून—उगाच हंसून ) अरे पैसा असला तर स्वर्ग खालीं येतो. काळजी करूं नकोस जवाहर...(ओपलला) नि हें पहा... यानें दुसरें लग्न करीपर्यंत याचा अर्धा भत्ता बंद करा आजपासून...! समजलं ? ( विचार करून ) आतां ती कपाळकरंटी घरांतून निघून गेली. ठीक झालें, छान झालें ! ! आतां ये म्हणावें पोखराज शेठला ! तिची अब्रू

तिच्याबरोबर गेली. तिचें ती भोगेल!!.. (थांबून) सुटलों एकदाचा या लफड्यांतून.. जाऊं दे! आपलें तें नवीन कंत्राट एका वर्षात पुरें करून दुसऱ्या वर्षी दुसरें घेईन. नि त्या पोखराज शेठला आडवा लोळवीन तरच मी नावाचा मोतीराम कोंदणे होईन! (कॅलेंडरकडे बघत) आज सोमवार! साहेबा! अर्नेस्ट डिपॉझिटचा चेक पाठविला कीं नाहीं रत्नागिरीला?

**ओपलः**—(सावकाश) चेकबुक आपणच सकाळीं घेतलें होतें.

**मोतीरामः**—(कमरेच्या किल्या शोधून काढीत) मीही विसरलों होतो... (तिजोरीचे दार उघडतो—आंतील सोन्याच्या विटा दिसतात. चेकबुक काढून) हं भरा हा चेक! करतो मी वर सही. (घड्याळा-कडे बघून) अजून अर्धा कलाक अवधि आहे टपालाला.

**ओपलः**—पाठवूं उद्यां...आज नको!

**मोतीरामः**—नाहीं. आजच्या आज गेला पाहिजे. (जवाहर तिजो-रींतील विटा मोजतो.) काय चालवलेसरे तूं? (एकदम तिजोरी बंद करतो.)

**ओपलः**—(विचार करतो–चेहरा उजळतो...जवाहर हें बघतों–चेक भरून) हं, करा सही (मोतीरामसमोर चेकबुक धरतो.)

**मोतीरामः**—(सही करून) जाऊं द्या आजच्या आज. माणसा-जवळ अफाट दौलत असणं हाच त्याचा पराक्रम होय! हीच त्याची अब्रू होय—आतां पाहतो, कोणाची माय व्यायतें मला नावें ठेवायचीं तीं.

**जवाहरः**—(पुढें येऊन) पाहूं द्या तो चेक काका!

**ओपलः**—(घडी करून) बरोबर भरलाय् मी तो.

**मोतीरामः**—तुला काय कळतंय्रे त्यांत?

**जवाहरः**—चूप बसा बाबा! (साहेबाच्या हातांतून चेक हिसका-वून घेतो... बघून) हा बेअररचा चेक आहे... नि पेई म्हणून रूपाचें नांव!

**मोतीरामः**—(आश्चर्यानें उठतो) म्हणजे? एवढी पंचेचाळीस हजारांची रक्कम रूपाला देणार होतास सायबा तूं?

**ओपलः**—होय! तिचा हक्क आहे!

मोतीरामः —पण मी जिवंत असतांना ?

ओपलः—तें मी आतां बोलत नाहीं. . . मागाहून घालीन मी आपली समजूत !

जवाहरः—असा फसवेगिरीचा धंदा करतोस काय साहेबा !

ओपलः—पण ही रक्कम मी मला घेतली नाहीं.

मोतीः—पण अशी कल्पना तरी कां मनांत आली तुझ्या ?

ओपलः—कां आली ? ( गहिंवरून ) त्या पोरींच्या धडाडीनें माझें मन ओथंबून आलंय आज !

मोतीः—म्हणजे ? तूं आंतून सामील आहेस त्यांना ?

ओपलः—( एकदम ) नाहीं —मुळींच नाहीं !

मोतीः—माझा विश्वास बसत नाहीं तूं म्हणतोस त्यावर !

ओपलः—( एकदम पुढें येऊन ) शेटसाहेब ! यापूर्वी चौतीस वर्षांत तुम्ही माझ्यावर कधींही गैरविश्वास दाखविला नाहीं !

जवाहरः—नि विश्वास ठेवला. तो अशी पैशांची अफरातफर करायला ?

ओपलः—(करारी वृत्तीनें) छोटेसाहेब ! जरा सांभाळून बोलाल तर बरें!

जवाहरः—( उसळून ) विश्वासघातक्या—थांब ! तुला पोलीसाच्या स्वाधीन करतो प्रथम ! माझ्यापुढें मिजास करतोय !

ओपलः—(मोतीरामकडे) शेटसाहेब ! मी मोतीराम कोंदणे कंपनीचा रजिस्टर्ड भागीदार आहे. या चेकची रक्कम मी माझ्या नावें मांडणार आहे. जरूर तेवढी उचल करण्याचा माझा हक्क आहे !

मोतीरामः—( त्याच्याकडे टकमकां बघत ) म्हणजे !

ओपलः—( तो चेक घडी करून आंतील खिशांत ठेवतो ) म्हणजे असं ! नीलाचा प्रश्न तुम्ही सोडवूं शकलां नाहीं. घरची मालकीण आहे रूपा...तो ती सोडवूं पहाते आहे. जेथें तुम्ही घराचे मालक म्हणून थकलां, तेथून ती पुढें जाऊं पहात आहे.

जवाहरः—म्हणजे...म्हणजे साहेबा...तूं तिला घर सोडायला सांगितलेस ?

**ओपल:**—असे कावून जाऊं नका ! तिच्या जाण्याचा अर्थ औदार्यानें समजून घ्यायला हवाय.

**जवाहर:**—तिनें आमचा अपमान करणें हें तिचें औदार्य काय ?

**ओपल:**—तो तुमच्या कमकुवत कल्पनेंतून जन्मलेला प्रश्न आहे. रूपावैनी मर्यादेवर आहे...तिनें केलें तेंच बरोबर केलें आहे. . . यापुढें—यापुढें औदार्याची हालचाल जर कुणाला करावी लागणार असेल तर ती पितापुत्रांनाच—( ओपल निघून जातो )

**मोतीराम:**—( ओपल गेला त्या दिशेकडे शून्य नजरेनें बघतो. टेलिफोन वाजतो )

**जवाहर:**—( तो घेऊन – मध्येंच ) बाबा, बाबा ! मंगलचा फोन आला आहे. रूपानें स्टेशनवर आपली पॅकार्ड सोडली आहे—मी जाऊन घेऊन येतो. ( टेनिसची रॅकेट हातांत घेऊन लांब टांगा टाकीत निघून जातो. )

**मोतीराम:**—( उठतो-उघडी तिजोरी बंद करून—ती बरोबर बंद झाली आहे कीं नाहीं तें पाहतो . . . त्याची तिजोरीवरील दत्ताकडे नजर जाते—तो दत्ताच्या डाव्या बाजूला त्याच्या मृत पत्नीचा फोटो नाहीं हें पाहून त्याला आश्चर्याचा धक्का बसतो . . . तेथील सोफ्यावर बसतो—हलकेंच हात कपाळाकडे नेऊन कपाळाला हात लाऊन बसतो. )

पडदा पडतो.

## तिसरा अंक समाप्त.